


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






छपाई, कागद वगैरेंच्या वाढलेल्या खर्चामुळे 'नवभारत'ची वार्षिक वर्गणी ऑक्टोबर २००८ पासून रु. ३००/- इतकी करण्यात आलेली आहे. कृपया याची नोंद घ्यावी. वर्गणीदार आणि वाचक यांनी सहकार्य करावे अशी विनंती आहे.



अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६१ । अंक १२ । सप्टेंबर २००८
श्रावण/भाद्रपद शके १९३०
वार्षिक वर्गणी २०० रुपये.
या अंकाची किंमत रु. २०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोनानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्य-निष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै० शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.





**संपादकीय पत्रव्यवहार :**
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).



अनुक्रमणिका








# नवभारत
सप्टेंबर २००८

अनुक्रमणिका



मुखपृष्ठ : साटाल ह्युयुक मधील छपरांना दारे असलेली घरे.

# श्रद्धा - विवेक आणि समाज, विज्ञान, शिक्षण

अरविन्द पारसनीस

**प्रास्ताविक**

लोकहितवादी, न्यायमूर्ती रानडे, आगरकर, र. पु. परांजपे, श्री. अ. डांगे, आंबेडकर, श्री. म. माटे, पु. ग. सहस्रबुद्धे, या भूतपूर्व विचारवंत व्यक्तींच्या महाराष्ट्रामध्ये आज वैचारिक गोंधळ दिसून येतो. त्याची कारणे अर्थात् अनेकविध आहेत. उदाहरणार्थ, जातिवादाची संकुचितता, आरक्षणाने उठविलेला गदारोळ, असलेल्या-नसलेल्या ऐतिहासिक उज्ज्वलतेत रमून जाण्याची वृत्ती, पारलौकिकाच्या दलालांच्या हाती आपले वैचारिक व भावनिक जीवन अर्पण करण्याची सामाजिक प्रवृत्ती व, सर्वात भयावह म्हणजे, विचारांपेक्षा व्यक्तींना महत्त्व देण्याची सार्वजनिक दिवाळखोरी.

अशा स्थितीत महाराष्ट्र सर्व क्षेत्रात मागे पडला नसता तरच नवल! १९०१ मध्ये न्यायमूर्ती रानडे यांच्या निधनानंतर लोकमान्य टिळकांनी केसरीमध्ये विस्तृत मृत्युलेख लिहून त्यांच्या कार्याचे दर्शन महाराष्ट्राला घडविले. रानड्यांच्या कार्याला आरंभ होण्याआधीच्या महाराष्ट्राचे वर्णन टिळकांनी "हा महाराष्ट्र एक थंड गोळा होऊन पडला होता" असे केले होते व 'रावसाहेबां'नी त्या मृतवत् गोळ्याला वैचारिक व क्रियाशील चैतन्य कसे दिले हे बारकाईने लिहिले होते. आजमितीला महाराष्ट्रात कोणी 'रावसाहेब रानडे' अस्तित्वात आहेत असे दिसत नाही.

पहिला प्रश्न विचारला जाईल की हे सर्व मान्य केले तरी श्रद्धा-विवेक आणि समाज या आजच्या विषयाशी याचा संबंध काय. ते सांगण्याआधी अलिकडील एक उदाहरण देतो. यामध्ये एका परिचित, क्रियाशील विचारवंतावर टिप्पणी करण्याचा उद्देश नाही. संज्ञांचा अर्थ व्यक्ती-व्यक्ती वेगवेगळा लावतात एवढेच त्यात अभिप्रेत आहे. साठ-बासष्ट वर्षांपूर्वी फर्गसन् महाविद्यालयात माझे इंग्लिशचे ट्यूटर असलेल्या ग. प्र. प्रधानांचा 'गांधीजींची डोळस श्रद्धा' हा लेख ०२ ऑक्टोबरच्या निमित्ताने सकाळमध्ये होता. आंध्र प्रदेशातील एका क्रियारत कार्यकर्त्याला गांधीजींच्या आश्रमात त्यांची भेट घ्यायची होती. त्याने पत्र लिहून सांगितले की तो तेथे राहिला तरी निरीश्वरवादी असल्याने तो त्यांच्या प्रार्थनेला उपस्थित राहणार नाही. झाडणे, संडास स्वच्छ करणे अशासारखी सर्व कामे मात्र करेल. तो जातिभेद मानत नाही, त्याच्या लहानशा आश्रमात हरिजन व सवर्ण एकत्र राहतात व भोजन करतात, इत्यादी. प्रधान लिहितात की गांधीजींनी रागावून उत्तर लिहिले "ईश्वर न मानणाऱ्या लोकांना आश्रमात स्थान नाही." पुढे त्याने गांधीजींच्या सत्याग्रहात भाग घेवून कारावास भोगला. कालांतराने त्याला गांधीजींची अनुज्ञा मिळाली व त्याची त्यांच्याशी भेट व चर्चा झाली, इत्यादी.

यामध्ये गांधीजींची 'डोळस' श्रद्धा दिसते असे प्रधान म्हणतात. यामध्ये मला केवळ आंधळी श्रद्धा दिसते! गांधीजींनी असा असहिष्णु विचार खरेच केला का याविषयी माझ्या मनात संदेह आहे. गांधीजी यापलीकडे होते. नसते तर त्यांनी ईश्वर अजिबात न मानणाऱ्या इहवादी जवाहरला जवळ केले नसते.

यातून "श्रद्धा (faith) म्हणजे काय?" व "विवेक (reason) म्हणजे काय?" हे जोडप्रश्न उद्‌भवतात. या प्रश्नांचा ऊहापोह पाश्चात्त्य विचारवंतांनी जितक्या बारकाव्याने केला आहे तितका भारतात व महाराष्ट्रात अलिकडे झालेला निदान माझ्या वाचनात नाही. 'विचारवंत'मध्ये मला वैज्ञानिक, सामाजिक व राजकीय, साहित्यिक, धार्मिक, सर्व क्षेत्रांतील विचारवंत व्यक्ती अभिप्रेत आहेत.

प्राज्ञपाठशाला या वास्तूत आज यासंबंधी विवेचन करायला मला संकोच वाटत नाही.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

**विश्वास (confidence) व श्रद्धा (faith)**

'श्रद्धा' म्हटले की साधारणतः बहुतेकांना धार्मिक वा आध्यात्मिक संकल्पना अभिप्रेत असतात. विवेचनात 'विश्वास' ही संज्ञा आणली तर स्पष्टता येते. एखादी स्त्री म्हणाली, "माझा पती परस्त्रीकडे जाणार नाही हा माझा दृढ विश्वास आहे" तर तिला वास्तविक काय म्हणावयाचे आहे? आजपर्यंतच्या अनुभवावरून ती हे म्हणत आहे, यामध्ये भविष्यात काय होईल याचा संदर्भ नाही. 'अनुभव' अवलोकनक्षम असल्यामुळे या अनुभवाचे बारकावे ती इतरांना सांगू शकेल. जेव्हा वेगळा काही अनुभव येईल तेव्हा तिचा 'विश्वास' नष्ट होईल. जर ती म्हणत असेल "अशी माझी श्रद्धा आहे", तर "का बरे?" विचारल्यावर ती कारणे सांगू शकणार नाही, एवढेच नाही तर वेगळा अनुभव येऊनसुद्धा कदाचित् तिच्या 'श्रद्धे' ला तडा जाणार नाही. दोन संज्ञातील हा भेद महत्त्वाचा आहे. साधारणतः लोक तो करीत नाहीत. तसेच दैनंदिन व्यवहारामध्ये लोक 'श्रद्धे'मध्ये वरील प्रकारच्या साध्या उदाहरणांचा अंतर्भाव करीत नाहीत. 'श्रद्धा' म्हणजे केवळ काहीतरी अननुभूत, अनाकलनीय, अवलोकन-अक्षम, आध्यात्मिक, धार्मिक, पारलौकिक अशाच गोष्टी-संबंधात असते ही कल्पना काढून टाकली तर सर्वसमावेशक व सुयोग्य चर्चा करता येते.

पुढे जाण्याआधी एक गोष्ट स्पष्ट करायला पाहिजे. विवेक-श्रद्धा अशी जोडी बनविल्यामुळे असे वाटेल की विश्वाचा व जीवनाचा अर्थ जाणून घेण्याचे हे दोन पर्यायी मार्ग आहेत. माझ्या मते "ते तसे नाहीत". किंबहुना माझी भूमिका आहे की विवेक हा एकमेव मार्ग आहे. का व कसा हे या लेखात विस्ताराने सांगणार आहे.

श्रद्धा (faith) व विवेक (reason), ज्ञान (spiritual knowledge) व विज्ञान (wordly knowledge)

श्रद्धा-विवेक विवाद करणाऱ्या व्यक्ती 'विचारवंत' असोत-नसोत, सुशिक्षित-अशिक्षित असोत, नागरी-ग्रामीण असोत, हा विवाद सहसा धार्मिक-अधार्मिक, अस्तिक-नास्तिक, ज्ञेय-अज्ञेय, अध्यात्म-इहवाद, याच स्वरूपात जातो. हळू हळू विवादाचे स्वरूप कुरुक्षेत्रासारखे होते. तसे होण्याचे कारण हे की धार्मिक-आध्यात्मिक प्रवृत्तीच्या व्यक्तींचा मुख्य प्रतिवाद असतो "विवेक व श्रद्धा हे दोन वेगळे प्रांत आहेत. विवेकाला स्पष्ट मर्यादा आहे तशी श्रद्धेला नाही. ईश्वर-अध्यात्म या संकल्पना विवेक-क्षेत्राच्या बाहेर आहेत." काही अस्तिक यापुढे जाऊन म्हणतात "श्रद्धेसह विवेकाचा उपयोग करून ईश्वराचे अस्तित्व सिद्ध करता येते." काहीजण म्हणतात "जिथे तुमचा विवेक, तुमचे विज्ञान त्यांच्या मर्यादांमुळे थांबते तिथे अध्यात्म चालू होतो." अशा प्रतिपादनात गोड समजूत असते की 'श्रद्धा' मर्यादातीत आहे! व्याख्यांची आवश्यकता व त्यांचे महत्त्व अशा वेळी प्रकर्षाने जाणवते. तेव्हा प्रत्येक संज्ञेची व्याख्या करू या. काही संज्ञांच्या व्याख्या संस्कृत कोशांत सापडतात व त्या साधारणतः सर्वमान्य असतात. उदाहरणार्थ, ज्ञान म्हणजे वेदांत-सार, "knowledge of Brahma or supreme spirit" विज्ञान म्हणजे "worldly knowledge, or knowledge derived from worldly experience (as opposed to ज्ञान)" परंतु श्रद्धा व विवेक यांचा अर्थ बारकाईने बघायला पाहिजे.

**श्रद्धा (faith)**

प्रत्यक्ष अनुभूतीविना, किंवा उलटा अनुभव असूनही, एखादी गोष्ट किंवा प्रतिपादन निर्विवाद समजले तर ती झाली श्रद्धा. "ईश्वर आहे, आत्मा असतो" हे म्हणणाऱ्या व्यक्तींना स्वतःचा असा अनुभव नसतो. उपनिषदांत (अथवा इतरत्र, ताल्मुद, बायबल, कुराण यामध्ये) असे सांगितले आहे, आदि शंकर, ज्ञानेश्वर, तुकाराम, विवेकानंद, कोणी गुरू, या सर्वांनी असे म्हटले आहे, इत्यादिपलीकडे पुरावा देता येत नाही. पुराण्या व्यक्तींचा अनुभव काय होता, कसा घेतला/आला, इत्यादी विवेचन करता येत नाही. तो अनुभव घेण्याची व तसा पुरावा गोळा करण्याची पद्धत सांगता येत नाही. त्या काळी अनुभव घेता येत असे

कारण तेव्हा महान व्यक्ती असत, आता घेता येत नाही कारण आता तशा व्यक्ती नाहीत असले प्रतिवाद निरर्थक आहेत. "ईश्वर आहे" या म्हणण्याला आधारभूत पुरावा— आभासीय (apparent) पुरावा !–असल्यास ग्राह्य मानला जातो, उलटा पुरावा अर्थात् अग्राह्य !

श्रद्धेचे व्यवहारात व विवेचनात पुष्कळ उपयोग आहेत ! अस्तिक म्हणतात की नास्तिकाची सुद्धा श्रद्धा असते. एक उदाहरण देतो. डेविड बोह्म याने जद्दू कृष्णमूर्तीसह पुष्कळ चर्चा केली. (या चर्चेचे पुस्तक उपलब्ध आहे.) कृष्णमूर्तीने विचारले "उद्या सूर्य उगवेल का ?" बोह्म उत्तरला "हो, अर्थात्". "तुला काय माहीत ? उद्याचा अनुभव तुला आज आला आहे काय ?". असा आणखी एक प्रश्न. "विमाने कोसळून प्रवासी मृत्युमुखी पडण्याच्या घटना होतात. तरी तुम्ही विमानप्रवास करता. तुम्ही असलेले विमान कोसळणार नाही कशावरून ?" हे प्रश्न विचारण्यामागे हेतू हा की सूर्य उद्या उगवेल ही किंवा विमान कोसळणार नाही ही श्रद्धाच आहे !

आज रात्री सूर्य दुभंगून पृथ्वीवरील आपल्या जीवनात उत्पात होणारच नाही, तो अस्तित्वात असूनसुद्धा इतर काही कारणाने उद्या उगवणार नाही हे शक्यच नाही असे ठामपणे सांगता येणार नाही. तथापि सूर्य उद्या उगवेल किंवा विमान कोसळणार नाही या मानण्यामागे इतिहास आहे, अनुभव आहे. स्पष्ट कारणे आहेत. हा इतिहास, हा अनुभव, ही कारणमीमांसा कोणालाही केव्हाही पडताळून पाहता येईल. येथे शक्यता व संभवनीयता यात फरक केला पाहिजे. उद्या सकाळी सूर्य उगविण्याची संभवनीयता ९९.९९९९...... प्रतिशत आहे हे पूर्वानुभवावरून आपण म्हणू शकतो. तथापि सूर्य न उगवण्याची 'शक्यता' गृहीत धरली आहे हे महत्त्वाचे आहे. "ईश्वर आहे, आत्मा आहे" म्हणण्यात तो नसण्याची शक्यता गृहीत धरलेली नाही, इतकेच काय, त्याला मानणाऱ्या कोणाचीच ती शक्यता गृहीत धरण्याची तयारी नसते. संभावनीयता वर्तविणे यात 'विश्वास' आहे, शक्यता नाही असे मानण्याला 'श्रद्धा' म्हणायचे. जर एखादा आस्तिक म्हणेल "ईश्वर नाही असे तुम्ही म्हणता तसेच मी म्हणतो की उद्या सूर्य उगवणार नाही" तर आपण सांगू शकू की "ठीक आहे, उद्या आपण पडताळा घेवू."

हा प्रतिवाद केला की अस्तिक, आध्यात्मिक, धार्मिक प्रवृत्तीचे लोक म्हणतात "छे, छे ! हे अगदीच शाळकरी तर्कशास्त्र झाले. आमच्या प्राचीन ग्रंथात स्पष्ट केले आहे की निसर्गातील चमत्कारापाठीमागे एक आदिम शक्ती आहे. तिला आम्ही 'ईश्वर' म्हणतो." ती शक्ती आहे किंवा नाही, तिचे स्वरूप काय आहे, ती मानवांच्या चांगल्या–वाईट क्रियाकर्मावर नियंत्रण ठेवते काय, इत्यादी सांगता येत नाही. "ईश्वर आहे, आत्मा अमर आहे" इत्यादी प्रतिपादने 'सिद्ध' करायला कितीही तथाकथित औपनिषदिक जटिल संकल्पना निर्माण केल्या तरी हे गृहीतक घेतल्याविना गत्यंतर नसते. 'वदतो व्याघात' ! या भावनेला 'विवेक' संबोधणे चूक आहे, व तिला केवळ 'श्रद्धा' संबोधून चालणार नाही, ही निखळ 'अंधश्रद्धा' आहे.

**विवेक (reason)**

कधी कधी मला प्राचीन भारतीय विचारवंतांची कीव येते, त्यांच्याविषयी अतीव आदर असूनही. त्यांनी ॲरिस्टॉटलप्रमाणे, कदाचित् त्याच्याआधी, न्यायशास्त्राची रचना केली परंतु सर्व विवेचन 'वदतो व्याघात' पद्धतीने केले. प्राचीन भारतीय तत्त्वज्ञानाच्या आजच्या उपयोगात हीच मोठी त्रुटी दिसून येते. मूलतः व आजही अत्युपयोगी अशा हठयोग व आयुर्वेद यातील आजचे संशोधन, त्यांच्या समर्थकांचा आजचा 'अभिनिवेश व प्रतिपादने पाहिली तर हेच आढळून येते. अमुक आसनाने, क्रियेने, औषधाने, उपायाने अमका लाभ होतो हे गृहीत धरायचे, थोडे इकडचे–तिकडचे सर्वेक्षण करायचे व निष्कर्ष काढायचा की पुराण्या ग्रंथात लिहिलेले सिद्ध झाले ! आणखी एक त्रुटी ही की संज्ञा, संकल्पना, श्लोक, वचने, इत्यादी वापरून आभास निर्माण करायचा की जुने ते सर्व सत्य आहे. संज्ञांच्या व्याख्या केल्याविना पुढे जाणे तर्कदुष्ट आहे हे समजायला विशेष प्रतिभेची आवश्यकता नाही.

'विवेका'ची व्याख्या अशी : संग्रहित उपलब्ध

पुराव्यावरून तर्कनिष्ठ निष्कर्ष काढणे म्हणजे 'विवेक'; निष्कर्ष आधीच मनात धरून पुरावा आपण निर्माण नाही करायचा. हा 'विज्ञाना'चा मार्ग, त्याची पद्धती, त्याची धारणा झाली, म्हणजे विज्ञानधारणा--नेहरू-सावरकरांनी मानलेली 'scientific temper' ही संकल्पना. विज्ञान केवळ विचारांतून तत्त्वे काढत नाही. एका शतकापूर्वी आइन्स्टाइनने सापेक्षतावाद दिला. काही अध्यात्मवादी लोकांना वाटते की त्याने तो केवळ विचारांतून काढला, ज्याप्रमाणे उपनिषद्‌कारांनी त्यांचे तत्त्वज्ञान काढले. तसे मुळीच नाही. त्याने प्रतिपादन केलेली दोन तत्त्वे अशी.

१. नैसर्गिक चमत्कारांचे नियम ते चमत्कार अवलोकन करणाऱ्या सर्व व्यक्तींच्या अपेक्षेने एकसारखेच असतात.

२. निर्वात, निर्वस्तू, निर्गुण अवकाशात प्रकाशाचा वेग सर्वांच्या अपेक्षेने एकच असतो (सेकंदाला तीन लक्ष किलोमीटर इतका).

ही तत्त्वे प्रयोगांनी सिद्ध झालेली होती, म्हणजेच ती अवलोकनक्षम आहेत. "ईश्वर अस्तित्वात आहे" यासारखी केवळ मनातून काढलेली नव्हती. सापेक्षतावादाचे निष्कर्ष त्यानंतरच्या अवलोकनाने सिद्ध झाले. नसते झाले तर विज्ञानाने व जगाने आइन्स्टइनला डोक्यावर घेतलेच नसते.

शक्यता व संभवनीयता या संकल्पनातील भिन्नता स्पष्ट करण्यासाठी एक साधे उदाहरण घेऊ. "भुते, पिंपळावरचा मुंजा, जलपऱ्या, वनपऱ्या, इत्यादी अस्तित्वात आहेत" हे एक प्रतिपादन व "जीवाणूसंसर्गामुळे रोग होतात" हे दुसरे. यातील कोणतेही असत्य असणे शक्य आहे. ही दोनच काय, कोणतेही प्रतिपादन सत्य आहे हे छातीठोकपणे सांगता येत नाही. परंतु दोहोंची असंभवनीयता एकसारखी नाही. पहिल्याची संभवनीयता अनुमाने शून्य आहे कारण अनेक प्रयत्नांती भुते इत्यादी सापडलेली नाहीत. दुसऱ्याची जवळ जवळ शतप्रतिशत आहे कारण ते अनेक परिस्थितीत अवलोकनाने सिद्ध झाले आहे.

**"का", "का", "का", ..... (केन, केन, केन!)**

वरती म्हटले "तर्कनिष्ठ निष्कर्ष काढणे." म्हणजे काय? श्रद्धा-विवेक वादातील एक महत्त्वाचा प्रतिवाद येथे उद्‌भवतो. अस्तिक-आध्यात्मिक प्रवृत्तीची व्यक्ती म्हणू शकेल "जशी माझी ईश्वरावर श्रद्धा आहे तशी तुमची तर्कावर आहे, एकूण एकच की." काही सांगितले की लहान मुले "का?" विचारतात. उत्तरे दिली की पुनःपुनः विचारत राहतात, तसे हे आहे. हे प्रश्न, असे प्रतिवाद अनंतकालापर्यंत चालू राहणार की काय?

"का?" हा प्रश्न कुठे थांबवायचा हे समजायला "संकल्पना म्हणजे काय?" याचे आकलन व्हायला पाहिजे. संकल्पना (concept) आपोआप निर्माण नाही होत. कोणतीही संकल्पना तिच्या 'पूर्वज', म्हणजे आधीच्या, संकल्पनेवर अवलंबून असते व तिचा अर्थ त्याच संदर्भात समजायला लागतो. पूर्वज संकल्पना शोधता शोधता, पाण्यासाठी विहीर खणता खणता ज्याप्रमाणे खडक लागला की पुढे खणता येत नाही त्याप्रमाणे, अशी संकल्पना येते की तीपुढे जाणे शक्य नसते. तिला आपण 'मूलभूत संकल्पना' अशी संज्ञा देऊ, इंग्लिशमध्ये Precept किंवा axiomatic concept. मूलभूत संकल्पना वास्तवतेला जुळतील अशा नसतील तर त्या निरुपयोगी समजायला पाहिजेत. "का?" हे प्रश्न केव्हा थांबवायचे, म्हणजेच मूलभूत संकल्पनेपर्यंत आपण पोहोचलो हे कसे कळेल? संकल्पनाविरोधी प्रतिवाद आपण करू शकत नाही, किंबहुना ती संकल्पना आपण नाकारू शकत नाही अशी स्थिती आली की; ती नाकारायला वा विरोधी प्रतिवाद करायला ती सत्य आहे असे मानल्याविना गत्यंतर नसले की.

खडक आला हे कसे कळेल? समजा कोणी म्हटले "तर्क (= न्याय) हा मानवाचा शोध आहे, तो निसर्गात नसतो, तो यादृच्छिक (arbitrary) आहे. तेव्हा तो चूक असणे शक्य आहे." न्याय चूक असेल तर त्याचे नियम वापरून काढलेले निष्कर्षसुद्धा चूक असतील. एक नियम (Law of Contradiction) असा आहे की एखादी गोष्ट (संकल्पना, विचार, वस्तू,

काहीही) स्वत:सारखी (समर्थक) व स्वत:विरुद्ध (विरोधक) एकाच वेळी असू शकत नाही. दुसरा असा की एखादी गोष्ट स्वत:सारखीच असते (Law of Identity). न्याय चूक, तर ते नियमही चूक. म्हणजे "न्याय यादृच्छिक (arbitrary) आहे" हे चूक आहे, म्हणजे "न्याय यादृच्छिक (arbitrary) नसेलही" असे झाले, व असेही झाले की न्याय यादृच्छिक आहे व नाहीही! येथे खडक आला!

याचा साधा अर्थ हा की "न्याय व त्याचे नियम गृहीत धरणे" ही श्रद्धा नसून भाषेच्या व विचारांच्या उपयोगांकरिता ते आवश्यक आहे. जीवन न्यायावरच आधारणे म्हणजे "विवेक".

### विविध दावे

मानवी जीवनात (आपल्याला) कोणत्याही काळी निरनिराळ्या दाव्यांना तोंड द्यायला लागते. प्रार्थनेने मनोकामना पूर्ण होतात, आपत्ती नष्ट होतात, व्याधी बऱ्या होतात; नवसाला देवता, गुरुमहाराज, साईबाबा, सत्यसाईबाबा, पावतात; मंदिरात, चर्चमध्ये, मशिदीत गेल्याने या व पारलौकीक जीवनात स्वर्गसुख लाभते; ग्रह-नक्षत्रांचा आपल्या जीवनावर अनिष्ट परिणाम होतो व योग्य उपायांनी तो शमविता येतो; विवाह जुळवायला कुंडल्या जुळल्या पाहिजेत; आजचे सर्व विज्ञान वेदांमध्ये आहे; आयुर्वेदाला सर्व काही माहिती होते; अंगाऱ्या-धुपाऱ्यांनी व्याधी शमतात; ताईत बांधल्याने सर्व चांगले होते; कावळा पिंडाला शिवला की मृत व्यक्तीचा आत्मा शांत होतो; ज्ञानेश्वराने रेड्याच्या तोंडून वेद वदविले, भिंत विमानासारखी उडविली; तुकारामाची बुडविलेली गाथा स्वत: इंद्रायणीने त्याला (व जगाला) परत दिली, नंतर तो सदेह स्वर्गाला गेला; दक्षिणेकडे दार असलेले घर घेवू नये; पायाळू व्यक्तीने पायाने चेपल्यास दुखणारी पाठ बरी होते; इत्यादी. काही वेळी असे दावे अज्ञानापायी केले जातात परंतु अधिकांश ते जाणूनबुजून केले जातात. कोठलेही दावे मानायला वा न मानायला निकष पाहिजेत. निकष न लावल्यामुळे शारीरिक, मानसिक, आर्थिक, सर्व प्रकारचे समाजशोषण हेतुत: केले गेले आहे व ते युगानुयुगे चालू राहिलेले आहे. जगातील सर्व संस्कृतींची व धर्मांची हीच शोकांतिका आहे.

खरे पाहता निकष एकच आहे! तो म्हणजे नेहमी विवेकाचाच उपयोग करणे, श्रद्धेचा नाही. श्रद्धेचा उपयोग करायचा असेल तर ती उपयोजिण्याचे नियम काय आहेत हे प्रथम सांगायला पाहिजे. शोकांतिका ही की कोणीही ते सांगू शकत नाही. काही श्रद्धाळू मान्य करतात की श्रद्धेला नियम नाहीत. स्वयंभू मानले जाणारे नियम कोणाच्या मनात असले तरी ते केव्हा उपयोजायचे, कसे उपयोजायचे, चुकीच्या पद्धतीने उपयोजले हे कसे ओळखायचे, 'स्वयंभू' नियम उपयोजून आपण स्वत:ची दिशाभूल तर करीत नाही हे कसे जाणायचे, इत्यादी प्रश्नांना उत्तरे मिळत नाहीत.

### कलह व हिंसा

"माझी श्रद्धा आहे तेव्हा मी प्रार्थना करणार, मंदिरात/सिनगॉगमध्ये/विहारात/चर्चमध्ये/मशिदीत जाणार, प्रार्थना करून देवाला साकडे घालणार, नवस करणार, कुंडल्या पाहणार. तुम्हांला नको तर तुम्ही नका करू" असे म्हणून चालणार नाही. मानवी इतिहासात या गोष्टी वैयक्तिक राहिल्या नाहीत. केव्हा ना केव्हा सांघिक क्रिया चालू झाल्या; सत्तेच्या अभिलाषेपायी, अहंकारापायी, 'श्रद्धे'पायी, समाजशोषणातून लाभ मिळविण्याचा एक सोपा मार्ग म्हणून. त्यांतून कलह व हिंसा निर्माण झाली व भविष्यकाली होत राहणार.

"ईश्वर, येहोवा, आकाशातील बाप, अल्ला हे एकच आहेत" हे कबीराने किंवा गांधीजींनी कितीही कंठरवाने सांगितले तरी त्या त्या धर्माच्या वा पंथाच्या जनांना मान्य असत नाही याचे कारण एकच, की या संकल्पनांच्या मुळाशी श्रद्धा आहे, विवेक नाही. ईश्वराला शरण जावून मोक्ष (म्हणजे काय?) मिळतो ही श्रद्धा बाळगणाऱ्यांच्या मते इतर श्रद्धा अयोग्य, दिवसातून पाच वेळा नमाझ केल्याने मृत्यूनंतर 'चमन'मध्ये (म्हणजे काय?) जायला मिळते ही श्रद्धा असणाऱ्यांच्या मते इतर श्रद्धा अयोग्य. या दोन्ही वा इतर श्रद्धा सर्वच खऱ्या

असणे संभवत नाही.

निष्कर्ष एकच निघतो की विवेकाने न चालणे म्हणजे चुकीच्या विचाराने चालणे, किंबहुना विचारच न करणे. विवेक न ठेवणे म्हणजे भरकटलेल्या मनात वाटेल ती गोड श्रद्धा बाळगणे!

**अंधश्रद्धा व अज्ञेयवाद**

एका शतकापूर्वी आगरकरांनी हे सर्व विवेचन केले होते. निराळ्या पद्धतीने आज तेच करावे लागत आहे. आगरकरांचा पराभव का व कसा झाला? त्यांच्या विरोधकांनी 'श्रद्धा' व 'अंधश्रद्धा' या दोहोंत भेद केला. परिणामी "आमच्या सनातन धर्माची ती श्रद्धा, इतर धर्मांची ती अंधश्रद्धा", "समाजातील अंधश्रद्धेचे निर्मूलन करायला आमचा विरोध नाही, श्रद्धेचे मात्र करायचे नाही कारण आमची श्रद्धा पूर्वापार आहे व समाजहिताकरिता आहे" अशी तत्त्वे निघाली. जेथे विवेक नाही तेथे अविवेकच आहे, मग त्याला श्रद्धा ही संज्ञा द्या किंवा अंधश्रद्धा ही द्या!

आगरकरवादाचा पराभव करण्यासाठी या लोकांतील 'जराशा' विचारवंतांनी आणखी एक तत्त्व तथा हत्यार निर्माण केले. आगरकर 'अज्ञेयवादी' होते (agnostic). म्हणजे "ईश्वर आहे परंतु काही लोकांना त्याची जाणीव नसते. प्राचीन ऋषीमुनींना व संतांना होती तेव्हा आपल्याला त्यांचेच मानायला पाहिजे."

वास्तविक आगरकर व त्या विचारांचे इतर जन – प्रस्तुत लेखक धरून – स्पष्टतेने 'निरीश्वरवादी (atheist)' आहेत. अंधश्रद्धा निर्मूलन समितीचे कार्य काही प्रमाणात यशस्वी झाले आहे हे खरे. परंतु ईश्वर/आकाशातील बाप/अल्ला या (अंध)श्रद्धेचे उच्चाटन झाल्याविना संपूर्ण निर्मूलन होणार नाही.

**विज्ञान, विवेक, श्रद्धा**

विज्ञानाची पद्धत 'विवेक' अशीच आहे. विज्ञानात श्रद्धा बसत नाही. पुण्यात प्रकाशित होणाऱ्या अंतर्नाद मासिकाच्या जून २००६च्या अंकातील 'विज्ञान म्हणजे काय?' या माझ्या लेखात विज्ञानाची लक्षणे पुढीलप्रमाणे देऊन विवेचन केले आहे ते जिज्ञासूंनी पाहावे.

(१) इहवादित्व, (२) बुद्धिप्रामाण्य, (३) ज्ञात-अज्ञातातील सीमांचा विस्तार, (४) अखंड परिवर्तनशीलता, (५) आत्ममंथन व स्व-मर्यादांची जाणीव, (६) स्वयंनियंत्रक यंत्रणा, (७) कर्मकांडाचा अभाव, (८) खंडनक्षमता

ही विवेकाची लक्षणे श्रद्धेमध्ये नाहीत. आता हे खरे आहे की जगातील, भारतातील, महाराष्ट्रातील पुष्कळ वैज्ञानिक आध्यात्मिक प्रवृत्तीचे आहेत. याचा अर्थ असा नाही की विज्ञानाला अध्यात्म मान्य आहे. उलट असे आहे की ९९% वैज्ञानिक, जन्मभर विज्ञानात घालवूनसुद्धा, विज्ञानाच्या तत्त्वज्ञानाकडे वळतही नाहीत. इतरांप्रमाणे बालपणापासून घरात, विद्यालयात, सार्वजनिक ठिकाणी व प्रसिद्धी माध्यमांतून झालेल्या संस्कारांमुळे मनात श्रद्धा ठेवून असतात.

विज्ञानाला ईश्वर ही संकल्पना मान्य आहे हे सिद्ध करायला आध्यात्मिक प्रवृत्तीचे लोक व वैज्ञानिक आइन्स्टाइनचे एक विधान उद्धृत करतात, "प्राकृतिक नियम ईश्वर फासा टाकून ठरवत नाही." त्यांची गोड समजूत असते की ज्या अर्थी प्रतिभावंत वैज्ञानिक हे म्हणतो त्या अर्थी विज्ञानाला ईश्वर मान्य आहे. हा त्यांचा अन्वयार्थ चूक आहे. 'ईश्वर' हा शब्द त्याने मध्ययुगीन डच् तत्त्ववेत्ता स्पिनोझा याच्या पद्धतीने ('harmony in Nature') उपयोजिला होता. दुसरे हे की हे विधान त्याने ऊर्जापुंजवादाच्या त्याला मान्य नसलेल्या 'सांख्यिकी संभवनीयता' (statistical probability) या संकल्पनेला विरोध करायला वापरला होता. तिसरे हे की अतिप्रतिभावंत वैज्ञानिकाने काही म्हटले तर ते विज्ञान या विचारप्रणालीला मान्य आहे असे म्हणता येत नाही; मात्र आइन्स्टाइन त्यांत नाही. त्याहून महत्त्वाचे हे की आइन्स्टानची इतर विधाने पाहायला पाहिजेत.

"वैज्ञानिक प्रार्थना करतात का?" या एका बालकाने १९३६ मध्ये विचारलेल्या प्रश्नाला त्याचे उत्तर होते "सर्व काही निसर्गनियमानुसार होत असते या तत्त्वावर वैज्ञानिक अनुसंधान उभारलेले आहे.

मनुष्यांच्या कृतीमागेसुद्धा निसर्गनियम असतात. प्रार्थना करून, म्हणजे पारलौकिक ईश्वराला साकडे घालून, निसर्गातील व मनुष्यांच्या जीवनातील घटितांवर परिणाम होऊ शकणार नाही." इतर प्रसंगी असेही म्हटले आहे "स्वतःच निर्मिलेल्या मनुष्यांना पाप-पुण्यासाठी शिक्षा देणाऱ्या वा त्यांची प्रशंसा करणाऱ्या, म्हणजेच मानवी गुणावगुण असलेल्या, 'ईश्वरा'वर माझा विश्वास नाही. शारीरिक मृत्यूनंतर व्यक्ती दुसऱ्या रूपात अस्तित्वात असेल यावरही नाही. दुर्बल मनाच्या लोकांचा हा विश्वास एक तर मृत्यूच्या भीतीतून आलेला असतो, नाही तर त्यांच्या आभासीय अहंगंडातून."

### अमेरिकेतील एक ठळक उदाहरण

'विवेक-श्रद्धा' हा वाद अमेरिकेत नव्याने उफाळून आला आहे. बायबलमधील उत्पत्ती सिद्धांतच सत्य आहे म्हणून डार्विनचा उत्क्रांती सिद्धांत टाकून देऊन विद्यालयांत तोच शिकवावा असा अट्टहास चालू झाला आहे. इतकेच नाही तर काही राज्यांनी तसे कायदेसुद्धा केले आहेत. ही 'प्रागतिक' अमेरिका! हार्वर्ड विद्यापीठ जगातील उत्कृष्ट दहांमध्ये गणले जाते. पहिल्या वर्षातील विद्यार्थ्यांकरिता 'व्यापक' शिक्षणाचा अभ्यासक्रम आखण्याकरिता नेमलेल्या समितीचा अहवाल एका वर्षापूर्वी प्रकाशित झाला (नोव्हेंबर २००५). त्यामध्ये विवेकाला योग्य स्थान मिळालेले नाही म्हणून प्राध्यापकांमध्ये खळबळ उडाली आहे. अहवालावर पुष्कळ आक्षेप घेतले जात आहेत, व मीही घेऊ इच्छितो.

पहिला हा की विज्ञान व प्रौद्योगिकी (science and technology) यांना योग्य स्थान दिलेले नाही. विज्ञानाने एकट्या विसाव्या शतकात केलेल्या क्रांतीने मानव संस्कृतीच्या विचार-व भौतिक-विश्वात घडलेल्या परिवर्तनाचे प्रतिबिंब अहवालात योग्य प्रकारे विचारात घेतलेले दिसत नाही. विज्ञानाने दिलेल्या सुविधा, औषधे, उपकरणे, इत्यादी 'चांगल्या' गोष्टी, व संहारास्त्रे इत्यादी 'वाईट' गोष्टी एवढ्यापुरतीच विज्ञानाची व्याख्या मर्यादित ठेवलेली आहे. केवळ विज्ञान 'आवडणे किंवा न आवडणे' हा निकष उपयोजिणे ही वैचारिक त्रुटी हार्वर्ड विद्यापीठात असावी हे महदाश्चर्य होय.

दुसरा आक्षेप हा की 'विवेक' व 'श्रद्धा' हे शब्द विद्यापीठीय अभ्यासक्रमाच्या पहिल्या वर्षातच एकत्र उपयोजिल्यामुळे हे दोन मार्ग एकमेकांना पर्याय आहेत अशी कल्पना साधारण विद्यार्थ्यांच्या मनात निर्माण होईल. मूलभूतरीत्या या संकल्पना वेगळ्या आहेत हे समजायला अधिक परिपक्वतेची आवश्यकता आहे हे समितीने लक्षात घेतलेले नाही. तिसरा आक्षेप हा की 'श्रद्धा' या संज्ञेच्या निरूपणाचे अहवालातील सार आहे की 'श्रद्धा' म्हणजे 'धर्म', परंतु अहवालात तसे स्पष्ट प्रतिपादलेले नाही. चौथा आक्षेप हा — ऐतिहासिक दृष्टीने 'धर्म' शिकवायला माझ्या मते काही हरकत नाही, किंबहुना शिकवावाच, परंतु त्याप्रमाणेच इहवाद, साम्यवाद, समाजवाद, जागतिकीकरण, इत्यादींचा अंतर्भाव 'व्यापक' शिक्षणक्रमात असायला पाहिजे, तो नाही.

असे मात्र समजायला नको की हा संपूर्ण अहवाल आक्षेपार्ह आहे. एकूण पाहिले तर तो विचारपूर्वक लिहिला आहे. समितीच्या १९ सभासदांत केवळ तीन विज्ञान-प्राध्यापक होते त्यामुळे असेल, किंवा इतर कारणांनी असेल, अहवाल एकांगी झाला आहे. तरीही 'आइन्स्टाइन क्रांती' हा विषय असावा अशी शिफारस केलेली आहे. जाताजाता का होईना, विवेकाचा समावेश असावा असे म्हटले आहे. येथे आपण नोंद एवढीच घ्यायची की जर हार्वर्डमध्ये विचारसरणी एकांगी आहे, तर महाराष्ट्र कुठच्या कुठे!

हे उदाहरण देण्याचा उद्देश असा की 'विवेक, श्रद्धा, व समाज' यासंबंधी जगभर मतभेद आहेत. फरक हा आहे की महाराष्ट्रात (व भारतातही) यासंबंधी विवेचन, चर्चा होत नाही. आजचा परिसंवाद अपवाद आहे म्हणून मी त्याचे अधिक हार्दिक स्वागत करतो.

**महाराष्ट्रातील सामाजिक परिस्थिती, शिक्षणपद्धती व मूलभूत विवेकाचा अभाव**

पुण्यात गेल्या महिन्यात झालेल्या एका पुरस्कार समारोहात दोन वैज्ञानिकांनी खंत व्यक्त केली की आजची तरुणाई श्रद्धेकडे वळली आहे व हा दोष काढून टाकला पाहिजे; या स्थितीत भारत महासत्ता होणे अशक्य असेही ते म्हणाले. बदलण्याचे त्यांच्या मनांतील मार्ग त्यांनी उघड केले नाहीत तथापि परिस्थिती तशी आहे हे खरे.

मला आवर्जून सांगायचे आहे की हा दोष तरुणांचा नसून त्यांच्या मातापित्यांचा, विद्यालये-विद्यापीठे यांचा. अभ्यासकांचा, तथाकथित सामाजिक विचारवंतांचा, सामाजिक-राजकीय नेत्यांचा, भक्तिपरंपरेचा, शिक्षणमंडळांचा, शासनाचा आहे. पूर्वप्राथमिक विद्यालयापासून मुलांना प्रति शालेयदिनी श्रद्धागर्भ प्रार्थना म्हणावी लागते. "गुरुर्माता गुरुपिता..." हा श्लोक म्हणायला लावण्यात काय आक्षेपार्ह आहे असे मला पुष्कळ लोक विचारतात. गुरु म्हणजे 'शिक्षक' या अर्थी मला 'गुरु'विषयी आदर आहे, मीही जीवनभर शिक्षकच आहे. या श्लोकाचे शेवटचे चरण आहेत "... या कुंदेंदुतुषारहारधवला..." ची. सरस्वतीला विद्येचे चिन्ह (icon) समजायला प्रत्यवाय नाही परंतु तिला "या ब्रह्माच्युतशंकरप्रभृतिभिर्देवैः सदा वंदिता।" अशी 'देवता' हे अस्तित्व प्रदान करणे आक्षेपार्ह आहे.

हे तर काहीच नाही अशी परिस्थिती निर्माण झाली आहे. आयुर्वेदासंबंधात इतकी श्रद्धायुक्त अतिशयोक्तीपूर्ण बेताल विधाने केली जात आहेत की साक्षात् चरक, सुश्रुत, वाग्भट अवतीर्ण झाले तर त्यांनाही अचंबा वाटेल. आयुर्वेदामुळे आध्यात्मिक विकास होतो, सर्व आयुर्वेदिक औषधे अतिगुणकारी आहेत, आयुर्वेद कॅन्सर व एड्स बरं करू शकतो, आजच्या 'नॅनो-टेक्नॉलजी'चा उपयोग आयुर्वेदकारांनी केला होता, एक ना दोन! ही निखळ (अंध)श्रद्धा आहे.

ज्या काली आयुर्वेदाचा उद्गम व विकास झाला त्या काली मानवी शरीराचे, त्यातील अवयवांचे व क्रियांचे, निदान करण्याच्या व औषधे बनविण्याच्या पद्धतींचे, प्रमाणे ठरविण्याची तंत्रे, इत्यादी ज्ञान तुटपुंजे होते. आयुर्विदांनी केलेले यत्न प्रशंसनीय होते यात शंका नाही. त्या काली आयुर्वेद खऱ्या अर्थाने 'विज्ञान' होता, आता नाही. तो होता तेथेच थांबला. दोनतीन सहस्रकांपूर्वी आजचे ज्ञान होते हा दावा हास्यास्पद असूनही केला जात आहे, त्यावर लोकांची श्रद्धा बसत आहे, गर्भवतीने ऐकण्याच्या आध्यात्मिक श्लोकांची 'गर्भसंस्कार' कॅसेट्स् उपलब्ध आहेत, तथाकथित आयुर्वेदिक औषधांचा सुळसुळाट झाला आहे.

तीन एक वर्षांपूर्वी मुंबईच्या एका उद्योजकाच्या पुत्राला आयुर्वेदिक भस्मे दिल्याने तीन महिन्यात मृत्यू आला. औषधयोजना केली होती महाबळेश्वर परिसरातील एका 'प्रख्यात' आयुर्विदाने. राहिलेल्या पुड्यांतील भस्मांचे भाभा परमाणु संशोधन केंद्राच्या रसायनशालेत पृथःकरण केल्यावर त्यामध्ये पारा, शिसे, जस्त, आर्सनिक्, इत्यादी विषारी पदार्थ प्रचंड प्रमाणात सापडले, ज्यामुळे रुग्णाची मूत्रपिंडे निकामी झाली. रुग्णांना ती भस्मे अजून दिली जात आहेत.

पुष्कळ भारतीय खेळाडू चांगल्या खेळानंतर (क्रिकेटमध्ये अर्धशतक वा शतक नोंदविल्यावर, टेनिसमध्ये गेम वा मॅच जिंकल्यावर) आकाशाकडे पाहून अभिवादन करतात. एका जगविख्यात मराठी क्रिकेट खेळाडूने अलिकडे "भूकंपाच्या आपत्तीत सापडलेल्या लोकांसाठी तुम्ही काय करू शकाल?" या प्रश्नाला "त्यांच्यासाठी मी देवाची प्रार्थना करीत आहे" असे उत्तर दिले. सर्व भारतीय जनता त्याला एक प्रमाणचिन्ह समजते आणि तो असे बोलतो! हा लाजिरवाणा पोरकटपणा बंद झाला पाहिजे.

**शिक्षित नागरी समाजातील (अंध)श्रद्धा**

शिक्षित नागरी समाजात (अंध)श्रद्धा बोकाळली आहे. हा समाज पंढरीच्या वाऱ्या करीत नसेल परंतु मनात निरनिराळ्या 'श्रद्धा' ठेवून आहे. तो आधुनिक विज्ञानाच्या संचार प्रौद्योगिक (information technology) या साधनाच्या

अनुक्रमणिका

साहाय्याने उदरनिर्वाह करतो परंतु त्याची जीवनशैली विवेकाधारित नसते. तो मोटारी चालवितो परंतु दसऱ्या-पाडव्यालाच त्या विकत घेतो व प्रतिवर्षी दसऱ्या-पाडव्याला त्यांना फुलांच्या माळा घालतो. वाङ्निश्चयित वरवधू अनेक गोष्टी एकत्र करतात परंतु विवाहाला मूहुर्त पाहिजेच, वं त्याआधी कुंडल्या पाहिलेल्या असतात.

नास्तिकाला दूरचित्रवाणी वाहिन्यावर सकाळी पाहायला काहीही नसते. सर्वत्र 'संस्कार', 'आस्था', प्रवचन देणारे दाढीवाले-बिनदाढीवाले महाराज वा शुभ्रवस्त्रावृता देवी, इत्यादी असतेच. त्यांच्या जोडीला राशीभविष्य, कोणत्या महिन्यात जन्मलेल्या व्यक्तींनी कोणती रत्ने वापरावी, कोणत्या मण्यांनी कोणत्या आपत्ती येत नाहीत व कोणत्या व्याधी नष्ट होतात, रुद्राक्ष कसे उपयोजावे, हेही असते. आता तर एक आकर्षक बांध्याची विदेशी ख्रिश्चन प्रचारिका भारतीय भाषांत पाय घट्ट रोवून उभी आहे.

आर्थिक प्रगतीमुळे वा इतरही कारणांमुळे नागरी वास्तूविकास पूर्वीपेक्षा कितीतरी अधिक होत आहे. बांधकाम व्यावसायिक आपल्या कंपन्यांची नावे 'साई बिल्डर्स', 'ईश्वर बिल्डर्स', 'सिद्धिविनायक बिल्डर्स', अशी ठेवतात. दोनचारांना मी विचारल्यावर त्यांनी सांगितले की "मग आमच्या सदनिका चटकन विकल्या जातात." त्यांची स्वतःची श्रद्धा असते हे वेगळेच. सदनिका विकत घेणाऱ्यांचे एवढ्याने समाधान होत नाही. दारे कोठे असावी, नळ कोठे असावे, पाकसिद्धीचा ओटा कोणीकडे असावा, फर्निचर कसे ठेवावे, ही सर्व आतील आखणी वास्तुशास्त्रवाल्याकडून करून घ्यायलाच पाहिजे! मग वास्तुशांतसुद्धा पाहिजेच.

आसने-प्राणायाम-क्रिया इत्यादी हठयोगाकडे लोकांचे मन वळते आहे. शारीरिक-मानसिक आरोग्यासाठी असते तर स्पृहणीय आहे हे उघड आहे. तसे नाही हे प्रत्यही दिसते. इतकी उदाहरणे पुरी आहेत!

**(अंध)श्रद्धेची प्रवृत्ती नष्ट करण्याचे काही मार्ग**

हे सर्व थांबवायला पाहिजे. ही प्रवृत्तीच नष्ट करायला पाहिजे. तीन मार्ग सुचवितो.

(आयुर्वेद हे उदाहरण घेऊन सुचवितो) एक म्हणजे आयुर्वेद महाविद्यालये, अनुसंधान केंद्रे, औषध उद्योग, इत्यादींना कंपल्शन केले पाहिजे की, सर्व गोष्टी आधुनिक वैद्यक-विज्ञानाच्या पद्धतींनी तपासल्या पाहिजेत. अतिशयोक्तीपूर्ण दावे करू नये हेही आयुर्वेदाच्या विद्यार्थ्यांना शिकवायला पाहिजे. काही महिन्यांपूर्वी सांसद वृंदा कारतने अशा गोष्टींना वाचा फोडली होती. तिचा पराभव केवल कोणा महाराजाच्या भक्तांमुळे नाही झाला, प्रत्यक्ष शासना-प्रशासनाच्या अनास्थेमुळेसुद्धा झाला. आयुर्वेद-शिक्षण एकविसाव्या शतकाला अभिमुख केले पाहिजे. हठयोगासंबंधात हेच केले पाहिजे.

पारलौकिक-आध्यात्मिक भावनेचा विकास करण्याचा जो अनिष्ट पायंडा प्राथमिक शिक्षणापासून पडला आहे व अधिकाधिक उपयोजिला जात आहे तो नष्ट तरी करावा किंवा त्यासह इहवादाची मूलतत्त्वे सोप्या भाषेत समाविष्ट करावी. मुलांना, विद्यार्थ्यांना दोन्ही विचारप्रवाह उपलब्ध करून दिले पाहिजेत, तेही ऐतिहासिक दृष्टीने. विद्यालयातील उच्च वर्गांच्या व महाविद्यालयांतील सर्व वर्गांच्या अभ्यासक्रमात 'विवेक व श्रद्धा' हा विषय आवश्यक म्हणून शिकवायला पाहिजे. केवल 'आर्ट्स्' प्रवाहात नाही तर विज्ञान, वाणिज्य, अभियांत्रिकी, या सर्व प्रवाहातसुद्धा. हा झाला दुसरा मार्ग.

तिसरा उपाय म्हणजे अंधश्रद्धा निर्मूलन समितीने नागरी अविवेक-निर्मूलनाचे कार्य चालू करणे. तिच्या कार्याला ग्रामीण भागात बरे यश आले आहे. 'ग्रामीण' म्हणजे 'निरक्षर व अशिक्षित' ही नागरी लोकांची समजूत चुकीची आहे. स्वतःला 'साक्षर व सुशिक्षित' समजणाऱ्या नागरी समाजात अधिकाधिक बोकाळत असलेल्या (अंध)श्रद्धेला आळा घालणे आवश्यक आहे. 'अंनिस'ने या कार्यात लक्ष घातले तर निर्मूलन व्हायला पुष्कळ साहाय्य होईल.

# शिक्षणातील व्यावसायिकता : भारतीय वास्तव

प्रा० श्री० मा० भावे

"विद्या-भारती-पश्चिम महाराष्ट्र प्रांत" या संस्थेचा मी अतिशय आभारी आहे, तो अशासाठी की, येथे जमलेल्या विद्‌वानांपुढे माझे विचार मांडण्याची संधी तिने मला दिली. या चर्चेसाठी संस्थेने 'जागतिकीकरण-भारतीय शिक्षणाची सद्यस्थिती आणि भविष्य' व 'शिक्षणाचे व्यावसायीकरण त्याची मर्यादा व भारतीय आवश्यकता' असे दोन विषय दिले आहेत. खरे तर हे दोन्ही विषय परस्परात इतके गुंतले आहेत की, ते निराळे काढून त्यांचे विवेचन करणे, ही अवघड गोष्ट आहे. तथापि, संयोजकांच्या सोयीसाठी मी असे म्हणेन की, मी 'व्यावसायीकरण' या विषयावर माझे हे टिपण लिहीत आहे.

(१)

विवेचनाला सुरुवात करण्यापूर्वी माझ्या प्रतिपादनाच्या मर्यादा स्पष्ट केल्या पाहिजेत. मी शिक्षकाचा व्यवसाय ४१ वर्षे केला. पण मी महाविद्यालये, विद्यापीठ व प्रौद्योगिक संस्था या ठिकाणी शिकविण्याचे काम केले. कनिष्ठ महाविद्यालये, माध्यमिक शाळा व प्राथमिक शाळा येथे शिकविण्याचा मला अनुभव नाही. त्यामुळे मी ज्याला "उच्च शिक्षण" म्हणतात त्याच स्तराविषयी बोलणार आहे. दुसरी मर्यादा अशी की, शिक्षक म्हणून काम करण्याचा माझा अनुभव मुंबई व पुणे या दोन शहरातील शिक्षणसंस्थांमधीलच आहे. विदर्भ-मराठवाडा, कोकण या भागात काय परिस्थिती आहे याची साक्षात् माहिती मला नाही. तथापि, शिक्षक चळवळीतील माझ्या सहभागामुळे मी महाराष्ट्र-स्तरीय व राष्ट्रीय-स्तरावरीलही शिक्षक संघटनातील अधिकार पदांवर होतो. त्यामुळे मुंबई-पुण्याखेरीजच्या महाराष्ट्रातील परिस्थिती व एकंदरीने देशातील शैक्षणिक व्यवस्था यांची परहस्ते माहिती मला काही प्रमाणात आहे. शेवटची त्रुटी अशी की, मी ज्या उच्च-शिक्षणाचा विचार करणार आहे, ते पाश्चात्त्य परंपरेतून आलेले उच्च शिक्षण आहे. भारतीय परंपरेत उच्च शिक्षण होते याची माहिती व त्या शिक्षणाचा अभिमान मला आहे. पण आपल्या आताच्या चर्चेशी त्या परंपरेचा संबंध काहीसा दूरचा आहे, म्हणून मी तो मुद्दा विचारात घेतलेला नाही.

पाश्चात्त्य परंपरेतही उच्च शिक्षणाची संकल्पना बदलत गेलेली आपणास दिसते. ऐतिहासिक दृष्ट्या आपल्याला हा बदल चार टप्प्यात झालेला दिसतो. पाश्चात्त्य परंपरेचा उगम आपल्याला प्लेटोची ॲकॅडेमी आणि ॲरिस्टॉटलची 'लायझेयम' ही संस्था येथपर्यंत नेऊन भिडवता येतो. या काळात उच्च-शिक्षण म्हणजे केवळ चिंतनात्मक स्वरूपाचे होते. आपण जे शिकतो त्याचे उपयोजन करता येते का, हा प्रश्न अप्रस्तुतच नव्हे तर अवमानकारक समजला जात होता. संकल्पनांची गुंफण करणे, त्यांची तार्किक संगती लावणे, निरीक्षणातून हाती आलेल्या तथ्यांचे वर्गीकरण करणे हे ज्ञानाचे स्वरूप होते व ते आत्मसात करून त्यात भर घालण्यास विद्यार्थ्यास तयार करणे, हा शिक्षणाचा उद्देश होता. दुसऱ्या टप्प्यावर शिक्षणक्रमात धर्माचे प्राबल्य माजले. चर्चसाठी धर्मगुरू तयार करणे ही विद्यापीठीय शिक्षणाची जबाबदारी झाली. जुन्या धार्मिक पोथ्या, प्रवचने गोळा करणे, त्या पोथ्या ज्या जुन्या भाषातून होत्या त्या ग्रीक व लॅटिन भाषांचा कसून अभ्यास करणे, त्या पोथ्यांचे अर्थ लावणे, त्यांच्यावर भाष्ये लिहिणे अशा प्रक्रियेतून शिक्षण चालत राहिले. पाश्चात्त्य उच्च शिक्षणाच्या इतिहासातील तिसरा टप्पा प्रबोधन-युगाचा. या युगात व्यापारावर आधारलेली भांडवलदारी अर्थव्यवस्था युरोपात अवतरत होती आणि विज्ञान, भूगोल, खगोल, रसायन इत्यादि शास्त्रविषयांचा पाया रचला जात होता. नवीन संकल्पना निर्माण करणे, त्यांचा अनुभवातून पडताळा घेणे, जुन्या संकल्पना तपासून सुधारून घेणे किंवा त्या मोडीत काढणे ही

अनुक्रमणिका

ज्ञानाची प्रक्रिया होती. विद्यापीठे व विद्यापीठाबाहेरील संस्था यातून या ज्ञानाची घडण व प्रदान होत होते. उच्च शिक्षणाच्या विकासाचा चौथा टप्पा युरोपातील औद्योगिक क्रांतीची व विज्ञानावर आधारित उत्पादनाची दुसरी पायरी सुरू झाली तेव्हापासून म्हणजे १९ व्या शतकाच्या मध्यापासून अवतीर्ण झाला व त्याच टप्प्याची विकसित रूपे आपण आता अनुभवीत आहोत.

हे सर्व थोड्याश्या विस्ताराने सांगण्याचे कारण असे की, शिक्षणव्यवस्था ही कायमच अर्थव्यवस्थेशी जोडली गेली होती, हा मुद्दा स्पष्ट झाला पाहिजे. उत्पादनव्यवस्थेचे प्राचीन, मध्ययुगीन व आधुनिक असे तीन कालखंड पडतात. आपणाकडे उच्च शिक्षण इंग्रजी साम्राज्यवादाच्या सोयीसाठी आणण्यात आले. त्यावेळी युरोपात उच्चशिक्षणाची सांगड औद्योगिक भांडवल-दारीशी घालण्यात आली होती. साम्राज्यवादी सत्तेला हिंदुस्थानात औद्योगिक भांडवलदारी यावी याची फारशी उत्सुकता नव्हती. मात्र त्याच वेळी आपल्या राज्याचे ध्येय म्हणून ही सत्ता असे सांगत होती की, "तुम्ही हिंदी लोक अंधश्रद्धा, वेडगळ रूढी, अडाणी धर्म यांच्या विळख्यात सापडून इतिहासाच्या मुख्य प्रवाहातून बाजूला पडला आहात. तुम्हाला सुशिक्षण देऊन व आधुनिक कायद्यांच्या अंमलबजावणीतून तुमची सुधारणा करून आम्ही तुम्हाला इतिहासाच्या मुख्य प्रवाहात आणून सोडणार आहोत." पाश्चात्त्यांच्या दृष्टीने इतिहासाचा मुख्य प्रवाह म्हणजे भांडवलशाही विकास. त्या मुख्य प्रवाहात हिंदुस्थानाला न्यायचे तर इथे भांडवलदारी उत्पादन व्यवस्था निर्माण करणे जरूरीचे होते; नुसते विद्यापीठीय शिक्षण देऊन काम भागणार नव्हते. पण झाले असे की, जी थोडी भांडवलदारी उत्पादन व्यवस्था आली ती अगदीच तुटपुंजी होती; उलट पाश्चात्त्य विचार मात्र विद्यापीठांच्या माध्यमातून जोमाने इकडे आले. त्यामुळे नवशिक्षितांना सरकारी नोकरी, वकिली, वैद्यकी या पलीकडे उद्योग उपलब्ध नव्हता व जनसामान्यात पैसा खेळता नसल्याने वकिली आणि वैद्यकी या धंद्यात मिळकत नव्हती.

(२)

श्री. जे. पी. नाईक यांनी 'दि एज्युकेशन कमिशन ॲण्ड आफ्टर' या आपल्या १९८२ सालच्या पुस्तकात १९४७ ते ८१ पर्यंतच्या शिक्षणव्यवस्थेविषयी म्हटले आहे की, स्वातंत्र्यानंतर जो प्रस्थापितांचा वर्ग सत्तेवर आला त्याची अशी इच्छा होती की, उच्च शिक्षणाचा दर्जा वाढला पाहिजेच, कारण आपल्याला आंतरराष्ट्रीय दर्जा गाठायचा आहे; पण हे उच्च शिक्षण प्रस्थापितांच्या पुरतेच मर्यादित राहावे. (पान १५९-६०). मला वाटते की, प्रस्थापित राज्यकर्त्या वर्गाची तशी इच्छा कदाचित् नसेलही; पण नियोजन व त्याच्या अनुषंगाने उभारलेली आर्थिक नियंत्रणांची यंत्रणा यांचा उपयोगही आर्थिक विकास प्रस्थापितांपुरताच व त्यांच्या काबूत राहावा यासाठी करण्यात आला.

परिणाम असा झाला की, अर्थव्यवस्थेला व आर्थिक व्यवहारांना जी गती यायला हवी होती व समृद्धीची जी लाट भांडवलदारी विकासक्रमाचा अवलंब केला असता आली असती, ती आली नाही व शिक्षणव्यवस्थेत जे नाना तऱ्हांचे नवीन अभ्यासक्रम निर्माण व्हायला हवे होते, तांत्रिक शिक्षण संस्थांचा जो प्रसार व्हावयाला पाहिजे होता, वाणिज्याशी संबंधित नवीन रोजगार व ते मिळविण्यासाठीचे शिक्षणक्रम यांना जी भरती येईल अशी अपेक्षा होती, त्यापैकी काहीच आले नाही. शिक्षणव्यवस्थेत आमूलाग्र सुधारणा घडवून आणण्याच्या घोषणा वेळोवेळी झाल्या; प्रत्यक्षात घडले काहीच नाही. सरकारी नियंत्रणे जशी अर्थव्यवस्थेवर पगडा ठेवून होती त्याप्रमाणेच ती शिक्षणव्यवस्थेवर गच्च पकड ठेवून होती.

शिक्षणव्यवहारात खऱ्या व मूलभूत अर्थाने बदल झाला तो १९९२ नंतर सरकारने जागतिकीकरण आणि मोकळी अर्थव्यवस्था ही आर्थिक धोरणे स्वीकारल्यानंतर अर्थव्यवहाराला गती आली, नवीन सेवा व उद्योग वाढू लागले तसतशी रोजगाराची नवीन क्षेत्रे उपलब्ध झाली. बँका, विमा-कंपन्या, दळणवळण व दूरसंचार, करमणूक व पर्यटन, परिचर्या, सुंदरीकरण, पोषाक-अभिकल्प (फॅशन डिझाईन), इत्यादी असंख्य क्षेत्रे २५ वर्षापूर्वी कोणाला माहितही नव्हती; आता ती उत्तम तऱ्हेने प्रतिष्ठित झाली आहेत. साहजिकच या क्षेत्रांना जरूर असणारी कौशल्ये ज्यांच्या ठिकाणी आहेत








असा प्रशिक्षित नोकरवर्ग किंवा व्यावसायिक निर्माण करण्याची जबाबदारी शिक्षणव्यवस्थेवर आली. त्यातून वेगवेगळ्या नवीन प्रकारच्या शिक्षणसंस्था उदयाला आल्या. शिक्षणाचा चेहरा मोहराच बदलून गेला.

या सर्व गोष्टी पाश्चात्त्य देशात साठ वर्षांपूर्वीच झाल्या होत्या. 'इंटरनॅशनल स्टॅण्डर्ड क्लासिफिकेशन ऑफ एज्युकेशन' या पुस्तकात उच्च शिक्षणाची कल्पना मांडताना म्हटले आहे की, 'सुमारे ११ वर्षे उत्तम पायाभूत शिक्षण घेतल्यानंतर विद्यार्थी जे विशेष शिक्षण घेतो, त्याला उच्च शिक्षण म्हणतात.' या पुस्तकात उच्च शिक्षणाच्या तीन पातळ्या कल्पिल्या आहेत. काही विशिष्ट व्यवसायांसाठी आवश्यक असणारी कौशल्ये शिकविणारे जे अभ्यासक्रम ते पहिल्या स्तरावर येतात. उदा. नर्सिंग किंवा माध्यमिक शिक्षक होण्यासाठी लागणारे अभ्यासक्रम. पदवीसाठीचे अभ्यासक्रम दुसऱ्या पायरीवर येतात. तर पदव्युत्तर अभ्यासक्रम व संशोधनपर अभ्यास यांची तिसरी पायरी होय. उच्च शिक्षणाची ही संकल्पना भांडवलशाही विकासक्रमाच्या प्रारूपाला धरून आहे.

या प्रकारचे उच्च शिक्षण देणाऱ्या संस्थांपैकी काहीनाच विद्यापीठ हे नाव दिले जाते. उच्च शिक्षण देणाऱ्या कोणत्या संस्थेला विद्यापीठ म्हणावयाचे हे त्या त्या देशाच्या शैक्षणिक परंपरेवरून ठरते. १९ व्या शतकात फ्रान्समध्ये 'ईकोल पोलितेक्निक', 'ईकोल नोर्माल' अशा उच्च शिक्षणसंस्था निघाल्या. पण त्यांना कोणी 'विद्यापीठे' म्हणून ओळखले नाही. आपल्या कडेही 'नॅशनल स्कूल ऑफ ड्रामा', किंवा 'फिल्म अॅण्ड टेलिव्हिजन इन्स्टिट्यूट' या उच्च शिक्षणसंस्था असूनही त्यांना कोणी विद्यापीठ म्हणून ओळखत नाही. हे सांगण्याचे कारण असे की, उच्च-शिक्षण व विद्यापीठ यांचा जो अविभाज्य संबंध आपण समजतो तसा तो नाही.

## (३)

'उच्च शिक्षण' ह्या संज्ञेचे असे स्पष्टीकरण दिल्यानंतर आपण 'व्यावसायीकरण' या संकल्पनेकडे वळू. 'व्यावसायीकरण' ही संकल्पनादेखील भांडवली-अर्थरचनेच्या सुदृढीकरणासोबत निर्माण झाली आहे. भांडवली अर्थरचनेचा केंद्रबिंदू निर्नियंत्रित बाजारपेठ हा आहे. जो उद्योग निर्नियंत्रित बाजारात आपले उत्पादन यशस्वी रीतीने व वरच्या दराने विकू शकतो तो उद्योग व्यवसायीकृत झाला असे समजले जाते. या दृष्टिकोणातून पाहायचे झाल्यास उच्च शिक्षण संस्थेने केलेले उत्पादन म्हणजे प्रशिक्षित किंवा योग्य ती कौशल्ये ज्याने आत्मसात केली आहेत, असा विद्यार्थी. ज्या शिक्षणसंस्थेचे विद्यार्थी रोजगाराच्या बाजारात उभे राहून उत्तम वेतन मिळवू शकतात ती संस्था व्यवसायीकृत झाली, असे म्हटले पाहिजे. स्पर्धेसाठी उत्सुक, जयाची जिद्द बाळगणारी आणि त्या जयाची किंमत पैशाच्या रूपात पदरात पाडून घेणाऱ्या संस्थेला शिक्षणव्यवसायातील 'प्रोफेशनॅलिझम्' अंगी बाळगून घेतलेली असे समजले जाईल.

आपल्याकडील शिक्षणव्यवसायात हा 'प्रोफेशनॅलिझम्' रुजू लागला आहे याची अनेक गमके वेळोवेळी अनुभवास येतात. 'इंडिया टुडे' सारखी नियतकालिके दरवर्षी शिक्षणसंस्थांचे गुणवत्ताक्रमांक प्रसिद्ध करतात. हे क्रमांक ठरविण्यासाठी कोणते निकष वापरण्यात आले व ते निकष कसे लागू करण्यात आले याची माहितीही दिलेली असते. विद्यापीठ अनुदान मंडळाने (वि. अ. मं.) राष्ट्रीय तपासणी व गुणवत्ताप्रमाणीकरण मंडळ (एन्.ए.ए.सी.) स्थापन केले असून तेही विद्यापीठे व महाविद्यालये यांना प्रमाणपत्र देत असते. 'नॅक'च्या कक्षेत न येणारी महाविद्यालये व शिक्षणसंस्था आय्.एस्.ओ. किंवा तत्सम प्रमाणपत्रांसाठी प्रयत्न करताना आढळतात. सारांश, शिक्षणसंस्थात स्पर्धा असावी व त्यांना गुणवत्तेनुसार अनुक्रमांक देण्यात यावेत ही कल्पना संबंधित लोकात मान्यता पावत चालली आहे.

पण स्पर्धा ही केवळ देशांतर्गत संस्थातच का मर्यादित असावी? आपल्या शिक्षणसंस्थांनी जागतिक स्तरावरील स्पर्धात सामिल का होऊ नये? भांडवली संस्कृतीचा विशेष असा असतो की, ती साऱ्या जगाला आपल्या कवेत घेते. आपला देश व त्यातील शिक्षणसंस्था यांनी भांडवलदारी विकासक्रमाचा स्वीकार केला असेल, तर त्यांनी जागतिक विकास प्रवाहात

सामील झाले पाहिजे; नव्हे, त्यांना तसे सामील व्हावे लागेल. अलिकडेच, वर्षाभरात, जगातील विद्यापीठांचे गुणवत्ताक्रमांक लावण्याचा उपक्रम एका जागतिक प्रतिष्ठानाने केला होता. त्यातील पहिल्या दोनशे विद्यापीठांच्या यादीत भारतातील एकही विद्यापीठ नव्हते. याचा अपमान आपल्याकडील काही शिक्षणवेत्त्यांना वाटला, असेही प्रसिद्ध झाले होते.

मुद्दा असा आहे की, आपण वीस वर्षापूर्वी जुने नियोजनवादी विकासाचे धोरण बाजूला ठेऊन भांडवलदारी मुक्त अर्थव्यवस्थेचे धोरण पत्करिले. शिक्षणव्यवस्था ही कायमच आर्थिक व्यवस्थेचा उपविभाग होऊन राहिली आहे. साहजिकच शासकीय नियंत्रणाखाली राहिलेली शिक्षणव्यवस्थाही टप्प्या टप्प्याने मोकळी होणे व स्पर्धेच्या आखाड्यात उतरणे, हे अटळ होते. स्पर्धा म्हटली की, 'प्रोफेशनॅलिझम्' आलाच. स्पर्धोत्सुकता व जिंकण्याची जिद्द व जे यश स्पर्धेतून मिळेल त्याचे रूपांतर पैशात करून घेण्याची आतुरता ही 'प्रोफेशनॅलिझम'ची वैशिष्ट्ये आहेत. या गोष्टी आपल्याला आवडतील किंवा आवडणार नाहीत; योग्य किंवा अयोग्य वाटतील; पण अपरिहार्यता ही श्रेणी या द्वैतांच्या पलिकडची आहे.

(४)

शिक्षण ही विकण्याची वस्तू आहे; शिक्षणसंस्था ह्या शिक्षण विकणाऱ्या मॉल्स आहेत; प्रत्येक शिक्षक हा मॉल मधला गाळा-धारक आहे अशा तऱ्हेचे चित्र 'प्रोफेशनॅलिझम'चे वर जे विवेचन केले आहे त्यातून आपल्या डोळ्यापुढे उभे राहाते आणि ते आपल्याला तिरस्करणीय वाटते. पण सरकारी नियंत्रणाखाली चाललेली महाविद्यालये व विद्यापीठे यातील शिक्षण हे देखील अतिशय ओंगळ व लाजिरवाणे आहे. स्वस्त धान्य विक्री योजनेखाली जी परवड झालेली धान्य विक्रीची दुकाने आपण पाहातो त्यात व या महाविद्यालयात आणि विद्यापीठात गुणवत्तेच्या दृष्टीने काही फरक नाही.

महाराष्ट्र शासनाने आज अशी व्यवस्था केली आहे की, महाविद्यालयातून गोळा होणारे शुल्क महाविद्यालयाच्या व्यवस्थापनाने शासनाकडे जमा करावयाचे व त्याच्या बदल्यात शासनाकडून मिळणाऱ्या वेतनासाठीच्या व गैरवेतनासाठीच्या अनुदानातून महाविद्यालयांचा कारभार चालवायचा यापैकी गैरवेतनीय अनुदान बहुधा मिळतच नाही किंवा अगदी अनियमित मिळते. त्यामुळे आज बहुतेक महाविद्यालयांच्या इमारती, लाकूडसामान, कचेऱ्या अतिशय धुळकटलेल्या, अस्वच्छ आणि उबग आणणाऱ्या अवस्थेत दिसतात. दरवर्षी फेब्रुवारीपासून वेतन-विषयक अनुदान वेळेवर येईनासे होते. शिक्षकांचे पगार अडून राहातात. ज्या शिक्षकांनी बँका, विमा कंपन्या इ. पतसंस्थांकडून कर्ज काढलेली असतात त्यांचे कर्जफेडीचे हप्ते थकतात. शिक्षक जिकीरीला येतात.

महाविद्यालयातील नवीन शिक्षकांच्या नेमणुकांविषयी करण्यात आलेल्या नियमांचे जाळे व त्या नियमांची अमंलबजावणी इतकी क्लिष्ट आहे की, उत्कृष्ट तर्कशास्त्री देखील ती गुंतागुंत उलगडू शकणार नाही. १९९८ सालापासून महाराष्ट्र शासनाने खुल्या जागांवर पूर्णवेळ शिक्षक नेमण्याला तात्पुरती बंदी घातली. राखीव जागांवर शिक्षक भरावयास परवानगी होती. तथापि, काही विषय असे आहेत की, तेथे अर्हता-पात्र मागासवर्गीय शिक्षक मिळत नाहीत. परिणाम असा झाला की, सुमारे ८ वर्षे शिक्षकांच्या नेमणुका तासावारीने किंवा घाऊक पगारावर होत राहिल्या. हे शिक्षक या परवडीमुळे मुळातच नाराज, नोकरीची शाश्वती नसल्याने त्यांची संस्था-विद्यार्थी-विषय-व्यवसाय या कशाचीच बांधिलकी नाही. केव्हाही नोकरी सोडून जाणे; व्यवस्थापनाने नगाला नग म्हणून कोणी शिक्षक उभा करावा; किंवा निवृत्त शिक्षकाला अतिथी शिक्षक म्हणून वर्गावर जायला सांगावे, अशा पद्धतीने शिक्षण चालू राहिले व मोठ्या प्रमाणात आजही ते त्याप्रमाणेच चालले आहे. याचे एकच उदाहरण द्यायचे तर, नौरोसजी वाडिया महाविद्यालयातून मी २००१ साली विभागप्रमुख म्हणून निवृत्त झालो तेव्हा तेथे गणित विषयाला ७ पूर्ण वेळ शिक्षकांच्या जागा होत्या. आज फक्त तीन पूर्णवेळ शिक्षक तेथे काम करीत आहेत.

गेली अनेक वर्षे ही ओरड आहे की, विद्यार्थी








शिक्षकांच्या व्याख्यानाला येतच नाहीत. या अनुपस्थितीमुळे मोठ्या संख्येने विद्यार्थी अनुत्तीर्णही होतात. पण त्याची पर्वा त्यांना असत नाही. याचे एक कारण असे आहे की, ठरविलेला अभ्यासक्रम, तो शिकवणारा शिक्षक, महाविद्यालयातील वातावरण, विद्यार्थ्याला अभ्यासक्रमाविषयी वाटणारी उमेद यांचा जो सुखाचा मेळा २०-२५ वर्षापूर्वी अनुभवाला येत होता त्याला भोके पडली आहेत. शासनाच्या जाचक नियमांमुळे व त्या नियमांच्या गचाळ अंमलबजावणीमुळे होत असलेली गळचेपी हे याचे एक महत्त्वाचे कारण आहे.

याचा अर्थ असा नाही की, नव्या खाजगी, विना-अनुदानित व भरपूर शुल्क घेऊन शिक्षण देणाऱ्या ज्या संस्था आहेत, तिथे दुधा-मधाच्या नद्या वाहत आहेत. शिक्षकांची व विद्यार्थ्यांची पिळवणूक, हडेलहप्पी व लहरी कारभार, वशिलेबाजी, आर्थिक गैरव्यवहार, नियमांची पायमल्ली यांचा बुजबुजाट अनेक संस्थातून अनुभवायला मिळतो. मी स्वतः माझ्या काही सहकाऱ्यांसह याविरुद्ध न्यायालयात व बाहेरही या संस्थांच्या व्यवस्थापनांशी लढे दिले आहेत. अशा प्रकरणात न्यायालयाने गैरप्रकार होतात हे मान्य करूनही अशी भूमिका घेतली की, संस्था जसजशा मुरत जातील तसतश्या सुधारत जातील, असे मानण्याला जागा आहे. सबब या गैरप्रकारांकडे अधिक उदार दृष्टीने बघावे. मला देखील ही भूमिका योग्य वाटते. सरकारी नियंत्रणाखालील शिक्षणापासून अपेक्षा ठेवण्यात मतलब नाही, हे गेल्या साठ वर्षांच्या अनुभवावरून कळून चुकले आहे. पण या खाजगी संस्थांकडून अपेक्षा ठेवायला हरकत नाही असे त्यातील काही संस्थांनी तरी जी प्रगती केली आहे, त्यावरून वाटते.

(५)

या आशेला आणखी कारण हे आहे की, या संस्था बाजारपेठेच्या प्रक्रियेशी बांधलेल्या आहेत. त्यांचे गिऱ्हाईक म्हणजे विद्यार्थी व पालक यांचा वर्ग, त्या वर्गाने संस्थेकडे पाठ फिरविल्यास या संस्थांचा निर्वाह चालणार नाही. या खाजगी संस्थातील काही अभियांत्रिकी महाविद्यालये आजच शिक्षकांना ठरीव वेतनाव्यतिरिक्त घसघशीत भत्ते देऊन आपल्या संस्थेत गुंतवून ठेवीत आहेत, हे चांगले लक्षण आहे. उद्या याच संस्था आपल्याकडे गुणवत्ताधारक विद्यार्थी यावेत यासाठी चढाओढ करतील व ग्रामीण भागातील गुणवत्ताधारक होतकरू विद्यार्थ्यांना आर्थिक मदत देऊन आपल्या संस्थातून शिक्षणासाठी आणतील, ही शक्यताही आहे. अनुदानित संस्थांना 'प्रोफेशनॅलिझम्'ची आवश्यकता नसते; पण खाजगी विनाअनुदानित संस्था 'प्रोफेशनॅलिझम' विना अस्तित्वच टिकवू शकत नाही.

ही परिस्थिती पाहता शिक्षणाविषयी आस्था बाळगणारी जी आपण मंडळी आहोत त्यांनी शिक्षणक्षेत्रातील बाजारपेठी प्रक्रिया व शिक्षणसंस्थातील 'प्रोफेशनॅलिझम्' आणखी सक्षम कसा होईल याची दक्षता घेतली पाहिजे. विद्यार्थी व पालक या ग्राहकवर्गाला आपले हक्क, आपल्या शिक्षणसंस्थेकडून असलेल्या अपेक्षा, आपण देत असलेल्या शुल्काची न्याय्यता याबद्दलचे शिक्षण दिले पाहिजे. मी व माझे सहकारी यांनी दोन वर्षे असा उपक्रम केला होता की, प्रवेश सुरू होण्याच्या वेळी पालक व विद्यार्थी यांचे मेळावे घेऊन त्यांना प्रवेश-प्रक्रिया, शुल्क प्रणाली, प्रवेशांच्या अटी, निरनिराळ्या संस्थांचा दर्जा यांची माहिती द्यावयाची. तथापि, हे काम अधिक नियमितपणे व अधिक कार्यक्षमतेने आणि मोठ्या प्रमाणावर झाले पाहिजे.

'विद्या-भारती पश्चिम महाराष्ट्र प्रांत' या संस्थेच्या प्रस्तुत परिसंवादात भाग घेण्यामागे माझा हाही हेतू होता की, सद्यःस्थितीत या संस्थेसारख्या संस्थांना काय करता येईल, हे त्यांच्यासमोर मांडावे. याचा अर्थ असा नाही की, या संस्थांना काय करता येईल याची कल्पना नसेल; पण मी व माझ्या सहकाऱ्यांनी जे केले त्याची माहिती दिली तर त्यांना असे काम करण्यास अधिक उत्तेजन मिळेल व आम्हालाही आणखी सहकारी मिळतील.

('विद्या-भारती पश्चिम महाराष्ट्र प्रांत' यांनी योजिलेल्या संमेलनात वाचलेला निबंध.)









# लोकप्रशासनात नैतिकता : सिद्धांत आणि व्यवहार

प्रा० विठ्ठल दहिफळे

नैतिकता हे सभ्य समाजाचे एक सुलक्षण आहे. नीतिमत्तेशिवाय समाजाची कल्पना संभवत नाही. नैतिकतेमधून व्यक्तीच्या ठिकाणी संचारलेला उत्साह (enthusiasm) सांसर्गिक असतो. तो सभोवतालचे वातावरण प्रफुल्लित करून प्रत्येकाला सकारात्मक कार्य करण्याची प्रेरणा देतो. निरुत्साह, उदासीनता, बेजबाबदार वृत्ती व नकारात्मकता नष्ट करून सामाजिक बांधिलकी प्रस्थापित करण्यात नैतिकता या मूल्याला अग्रगण्य स्थान आहे. ज्या समुदायात नीतिमत्ता नाही तो समाज बनण्यास पात्र नाही. म्हणून नीतिमत्ता या अर्थाने समाजाचे व्यवच्छेदक लक्षण आहे. आदिम समुदायात नीतिमत्ता नव्हती. शक्ती हीच नीती होती. परंतु पुढे विवेकाने व्यक्तीच्या अंतःकरणात प्रवेश केल्यानंतर चांगल्या-वाईटातील फरक त्याला कळू लागला. इथेच नैतिकतेचा उदय झाला. आचरणविषयक संकेतांची निर्मिती झाली. (Codes of conduct) चोरी करू नये, कोणालाही इजा करू नये, ठार मारू नये इत्यादी काही संकेतांचे पालन व्यक्ती करू लागल्या. कुणी त्याला सामाजिक नीतिमत्ता म्हणू लागले तर कुणी त्याला निसर्ग नियमाची संज्ञा दिली. समाज जसा-जसा प्रगत होऊ लागला तस-तसे या संकेतांना, नियमांना सुनिश्चित रूप प्राप्त होऊ लागले. पुढे धर्मसंस्थेने सामाजिक संकेतांना मान्यता देऊन नैतिक हितोपदेश करण्यास प्रारंभ केला. राज्य संस्थेच्या उदयानंतर समाजहितकारक कायद्यांची व नियमांची निर्मिती करून शासन संस्थेने सर्व सूत्रे आपल्या हाती घेतली. पूर्वी तिचा तोंडवळा पोलिसी होता आज तो लोककल्याणकारी झाला आहे.

लोकशाहीप्रधान राज्यात जनता, प्रशासक आणि राजकीय नेत्यात (Policy Makers) नैतिकता असणे ही सुशासनाची एक महत्त्वपूर्ण अट आहे. या तीन पैकी एकाही घटकात नैतिकतेचा अभाव असेल तर कल्याणकारी राज्याची निर्मिती होणे नाही. लोकप्रशासकांना आज विधानमंडळाद्वारा बनविण्यात आलेल्या कायद्यांची वा धोरणांची केवळ अंमलबजावणीच करावी लागत नाही तर नियम, अधिनियम, उपविधीही तयार करावे लागत आहेत. यामुळे प्रशासकांच्या जबाबदाऱ्या व उत्तरदायित्वात वाढ झाली आहे. २१ व्या शतकाच्या पूर्वार्धात आज राज्याने कल्याणकारी संकल्पनेच्याही पुढे पाऊल टाकले आहे. आजचे राज्य लोकतांत्रिक युगातील असे विकेंद्रीत राज्य आहे की, ज्यात स्वातंत्र्य, न्याय, समता व मानवी प्रतिष्ठा (Human dignity) या मूल्यांना विशेष महत्त्व दिले आहे. या पार्श्वभूमीवर लोकप्रशासकांच्या ठिकाणी नैतिकता, सत्यनिष्ठा, सेवाभाव, समत्वबुद्धी, तत्परता आणि जबाबदारी इत्यादी मूल्यांची आवश्यकता आहे. यापुढे लोकप्रशासकांना श्रद्धा, इमानदारी, मानवीय हिताप्रती भक्ती अन्तरसंबंधाची समज आणि उद्दिष्टाभिमुख वाटचाल करावी लागणार आहे. यामुळे प्रशासनात नैतिकतेचा प्रश्न आज ऐरणीवर आला आहे. प्रस्तुत लेखात नैतिकतेची व्याख्या करण्यात आली असून लोकप्रशासनात नैतिकतेची आवश्यकता का आहे यावर प्रकाश टाकण्यात आला आहे.

**नैतिकता काय आहे ? What is ethical ?**

नैतिकता ही सापेक्ष संकल्पना आहे. एकाच्या दृष्टिकोणातून असलेली नैतिकता ही दुसऱ्याच्या दृष्टिकोणातून अनैतिकता असू शकते. यामुळे व्यक्तिपरत्वे नैतिकतेचे संदर्भ बदलतात. स्वतःचा फायदा कशात आहे ते पाहणे, ते पदरात पाडून घेण्याचा प्रयत्न करणे व त्यासाठी जास्तीत जास्त परिणामकारक ठरणारी साधने वा मार्ग यांचा वापर करणे हा माणसाचा स्वभाव आहे, नव्हे ती मानवी स्वभावप्रकृतीची एक प्रतिष्ठित उपपत्ती आहे. यामुळे सामाजिक संदर्भ चौकटीतून नैतिकता अथवा नीतिविचाराला 'उन्नत स्वार्थ' या गटात टाकावे लागते. 'उन्नत स्वार्थ' ही जेव्हा

अनुक्रमणिका

नीतिविचाराची बैठक असते तेव्हा नीतिमत्तेचा सार्वजनिक आशय लय पावतो व वैयक्तिक आशय प्रभावशाली होतो. उदा. प्रचलित कायदे, नियम यांचे पालन करून शासनाच्या तिजोरित नियमित उत्पन्न कर भरणे हा नीतिमत्तेचा वैधानिक दृष्टिकोणातून असणारा 'सार्वजनिक' आशय होय. तर प्रचलित कायद्यातून पळवाट शोधून कर चुकविणे आणि तसे करू शकल्याबद्दल स्वत:ला धन्य समजणे हा नैतिकतेचा 'वैयक्तिक' आशय आहे.

समाजात काही लोकरीती अशाही असतात की ज्याबाबत वैयक्तिक-सार्वजनिक असा भेद असत नाही, त्यांच्या पालनाबाबत समाज दक्ष असतो. त्याचे उल्लंघन झाल्यास समाजात तीव्र पडसाद उमटतात. त्याच्या उल्लंघनामुळे समाजजीवन धोक्यात येईल, अनर्थ ओढवेल असे लोकांना वाटते. अशा बंधनकारक लोकरीतींना सामान्यपणे नैतिकता असे म्हणता येते. समाज जसा-जसा विशाल, अधिकाधिक विभेदित व गुंतागुंतीचा होत गेला तस-तशी नैतिकतेच्या अमंलबजावणीसाठी कायद्यांची निर्मिती करून शासन-यंत्रणा अधिक क्रियाशील झाली. पूर्वी ही जबाबदारी धर्मसंस्थेने पार पाडली. आज त्याची जागा शासन-संस्थेने घेतली आहे. शासन-संस्थेला लोकप्रशासक या कामी मदत करतात म्हणून जनता, लोकप्रशासक व धोरणनिर्मात्यात नीतिमत्ता असणे ही लोककल्याणकारी राज्याची गरज आहे. यामुळे लोकप्रशासनात व्यक्तिगत, सार्वजनिक आणि व्यावसायिक नीतिमूल्यांत सामंजस्य वा संवाद असणे महत्त्वाचे आहे. या तीनही घटकांत जेव्हा संवाद निर्माण होईल तेव्हा सुशासनाच्या दिशेने खऱ्या अर्थाने वाटचाल करता येईल. पीटर ड्रकर यांच्या शब्दात 'व्यावसायिक आणि वैयक्तिक मूल्यांचा संगम ही सर्वोत्कृष्ट प्रशासनाची नांदी होय.' प्रशासक तोच आहे जो निर्णय घेतो, जो निर्णय घेऊ शकत नाही तो केवळ अधिकारी आहे. निर्णय घेताना जर तो दबावाला बळी पडत असेल तर त्याच्यातील प्रशासकाचा अंत जवळ आला असे समजावे. निर्णयकरणामुळे तो लोकनिंदेस पात्र ठरला तर तो कर्तव्यापासून भटकला, जर तो पक्षपात करू लागला तर त्याची सेवाच धोक्यात आली असे मानावे. यामुळे आज लोकप्रशासकाच्या ठिकाणी बुद्धीसंगत नैतिकतेची नितांत आवश्यकता आहे. पण नैतिकतेचे समर्थन करण्याची, परीक्षण करण्याची आधुनिक रीत कोणती? नैतिक निर्णय कशाला म्हणावे? नॉमर्न व्हिन्सेंट आणि केनिथ ब्लँचर्ड यांनी आपल्या 'The Power of Ethical Management' या ग्रंथात नैतिकतेचे परीक्षण (ethical check questions) करणारे तीन प्रश्न सांगितले आहेत.

- मी जे काही करतो ते वैधानिक आहे काय? नागरी अथवा कंपनीच्या धोरणांचे त्यामुळे उल्लंघन होईल काय?
- मी जे काही करतो ते संतुलित आहे काय? अल्पकालीन व दीर्घकालीन उद्दिष्टपूर्तीसाठी ते योग्य आहे काय?
- मी जे काही करतो त्याबद्दल मला काय वाटते? मला त्याचा अभिमान वाटेल काय? माझा निर्णय वा कृती वर्तमानपत्रात छापून आली तर मला चांगले वाटेल काय? माझ्या कुटुंबियांना त्याची माहिती मिळाली तर मला चांगले वाटेल काय?

प्रशासनात कार्य करताना उपरोक्त प्रश्नांचा लोकप्रशासकांची कृती नैतिक आहे की नाही हे निश्चित करण्यासाठी एक महत्त्वपूर्ण आधार ठरतो. उपरोक्त प्रश्नांची उत्तरे स्वत:ला, कुटुंबियांना या समाजाला समाधान देणारी व सकारात्मक असतील तर लोकप्रशासकांची वाटचाल नैतिकतेच्या मार्गाने होते आहे असा निष्कर्ष काढावयास हरकत नाही. याशिवाय नॉर्मन व्हिन्सेंट आणि केनिथ ब्लँचर्ड यांनी संघटनेच्या संदर्भात कर्मचारी व अधिकाऱ्यांची नैतिक शक्ती वाढीस लावण्यासाठी पाच तत्त्वे सांगितली आहेत. ज्याला 'Five Ps' असे म्हणता येईल.

अ) हेतू अथवा उद्देश (Purpose)

संघटनेची ध्येये ही उच्च पातळीवरून संज्ञापीत केली जातात. आपली संघटना विशिष्ट मूल्य, ध्येय, अपेक्षा व व्हिजन साकार

करण्यासाठी निर्माण झालेली असते की ज्यामुळे कोणते वर्तन स्विकरणीय आणि कोणते अस्विकरणीय यासंबंधी निश्चित निर्णय घेण्यास मदत मिळते.

ब) अभिमान (Pride)

आपणास स्वतः बद्दल व संघटनेबद्दल अभिमान वाटला पाहिजे. जेव्हा आपणास तसे वाटेल तेव्हा कोणतेही अनैतिक वा संघटनाविरोधी कार्य करण्याचा आपणास मोह होणार नाही.

क) संयम (Patience)

नीतिमूल्यांवर आधारित व्यवहार केल्यामुळे दीर्घकालीन यशाचा मार्ग मोकळा होतो यावर आपला ठाम विश्वास असला पाहिजे. आपली यशसिद्धी आणि तिथपर्यंत पोहोचण्याचा मार्ग यात संतुलन असले पाहिजे.

ड) चिकाटी (Persistence)

आपण नैतिक तत्त्वांवर वाटचाल करू अशी आपली प्रतिबद्धता वा बांधिलकी असावी. संघटनेच्या उद्दिष्टांना अनुसरूनच आपली कृती घडते आहे याची खात्री आपणास पटली पाहिजे.

इ) वास्तवता (Perspective)

आपले व्यवस्थापक आणि कर्मचारी निरंतरपणे कार्य करतात. परंतु त्याच वेळी आपण कोठे आहोत हे पाहण्यासाठी सिंहावलोकन करतात. कार्याचे मूल्यांकन करतात आणि कोठे असले पाहिजे तिथपर्यंत कोणत्या मार्गांनी गेले पाहिजे यासाठी निर्णय घेतात.

या पंचतत्त्वांना प्रमाणभूत मानून लोकसेवकांनी वाटचाल केली पाहिजे. तरच प्रशासनात नैतिकता निर्माण होऊन लोककल्याण साध्य होऊ शकेल. भारतासारख्या उदयाचली येऊ घातलेल्या महासत्तेच्या संदर्भात याची अधिकच आवश्यकता आहे.

व्यक्तिगत, सामाजिक आणि संस्थात्मक पातळीवर नैतिकता या मूल्याच्या अभिवृद्धीसाठी नैतिकतेची संदर्भचौकट निर्माण होणे आवश्यक आहे. सामान्य माणसांच्या अपेक्षापूर्तीसाठी अशा चौकटीची नितांत गरज आहे. तीन पातळ्यांवर त्याची चर्चा पुढीलप्रमाणे करता येते.

अ) व्यक्तिगत ज्ञानात्मक-नैतिक संदर्भ चौकट

Individual Cognitive-Ethical/ Framework

नैतिकतेची ही संदर्भ चौकट व्यक्तीच्या ठिकाणी असलेल्या जाणीवेच्या पातळीशी संबंधित असते. आपल्यातील सद्सद्विवेकबुद्धीच्या आधारे निर्माण झालेली प्रत्येक व्यक्तीजवळ काही स्वतःची नीतिमूल्ये असतात. व्यक्तिगत अभिवृत्ती, अभिमुखता, मूल्यात्मकता त्याच्या जाणीवा समृद्ध करतात. जे काही तिच्या (व्यक्ती) मनात आहे त्याचा इष्टानिष्ट परिणाम त्याच्या कृतीवर पडतो. कुटुंबातील संस्कार, वातावरण आणि सामाजिकरणातून आत्मसात केलेले संस्कार व्यक्तीची ज्ञानात्मक-नैतिक संदर्भ चौकट निश्चित करतात. लोकप्रशासक ही देखील एक व्यक्ती आहे तेव्हा तिची जडणघडण कशी झाली यावर त्याच्यातील नैतिकता ठरत असते. प्रशासकीय व्यवस्थेचा घटक या नात्याने आपल्या भूमिकेविषयी व प्रभावक्षमतेविषयी तिला कितपत माहिती आहे, त्याबद्दल तिला भावनिक आस्था आहे की औदासिन्य, स्वतःचे मूल्यमापन ती व्यक्ती प्रशासकीय व्यवस्थेचा एक जबाबदार घटक या नात्याने करते काय? तसे करत असेल तर त्या लोकप्रशासकाची नैतिकता श्रेष्ठ दर्जाची आहे असे समजावे. असा प्रशासक लोकहितासाठीच सेवा करतो.

ब) संस्थागत कार्यात्मक-नैतिक संदर्भ चौकट

Institutional Functional Ethical Framework

नैतिकतेच्या या संदर्भ चौकटीचा संबंध हा तो (प्रशासक) ज्या संघटनेत काम करतो तिच्या औपचारिक संरचनेशी असतो. प्रत्येक व्यक्तीला आपल्या विवेकबुद्धीला अनुसरून मुल्याधिष्ठीत व्यवहार करण्याचा जसा अधिकार असतो तसा प्रत्येक संस्थेला आपल्या उद्दिष्टानुसार वाटचाल करण्याचा

अधिकार असतो. कोणतीही संघटना उद्दिष्टाशिवाय अस्तित्वात येऊ शकत नाही. संघटनेची ध्येये साकार करताना प्रसंगी प्रशासकाला आपली वैयक्तिक अभिरूची बाजूला ठेवावी लागते. अशा प्रकारे संघटनेची औपचारिक रचना कर्मचाऱ्यांच्या वैयक्तिक अभिमुखता, अभिरूचींना संघटनेच्या ध्येयवादात परावर्तीत करते. यामुळे संघटनेच्या पातळीवर प्रशासक, कर्मचाऱ्यात नैतिकता निर्माण होऊन संघटनेची उद्दिष्टपूर्ती होते. प्रशासनात एकरूपता आणि कार्यक्षमता येते.

क) सामाजिक आदर्शात्मक-नैतिक संदर्भ चौकट
Societal Normative Ethical Framework

या प्रकारची नैतिक संदर्भ चौकट संबंधित समुदायाच्या प्रथा, परंपरा, संकेतांवर अवलंबून असते. प्रत्येक समुदायाची संस्कृती, ऐतिहासिक वारसा भिन्न असल्यामुळे सामाजिक चौकट ही वेगवेगळी आढळून येते. व्यक्ती समाजाच्या बाहेर नाही, सामाजिक व्यवस्थेचा ती अभिन्न घटक आहे. यामुळे ती ज्या समुदायात वाढली, मोठी झाली तेथील मूल्ये, प्रमाणके, आदर्श यांचा प्रभाव व्यक्तीवर होणे स्वाभाविक आहे. प्रशासकीय संघटनेत कार्य करताना लोकप्रशासकावर सामाजिक प्रमाणकांचा (Social norms) प्रभाव पडतो. यातून त्याची व्यावसायिक नीतिमत्ता निर्धारित होत असते.

कार्यक्षम व लोकाभिमुख प्रशासनासाठी नैतिकतेच्यावरील तीनही संदर्भ चौकटीत सुसंवाद निर्माण होणे अगत्याचे आहे. व्यक्तिगत पातळीवर नीतिमूल्यांची चौकट जितकी बळकट तितकी सामाजिक चौकट सशक्त होऊन संघटनात्मक पातळीवर सर्वोत्तम प्रशासनाचा आविष्कार शक्य आहे.

लोकप्रशासनातील नैतिकतेचा जागतिक संदर्भ

आधुनिक कालखंडात प्रगत पाश्चिमात्त्य देशात लोकप्रशासक आचारसंहितेबरहुकूम व्यवहार करताना दिसत असले तरी पाश्चिमात्त्य सभ्यतेमध्ये नीतिविचाराला हजारो वर्षांचा इतिहास आहे. याची खुलासेवार मांडणी आपणास प्रा. अलस्डेअर मॅकिंटायर यांच्या 'A short Histroy of Ethics' या ग्रंथात आढळते. या ग्रंथाचा विवेचनात्मक परिचय करून देणारे पाश्चिमात्त्य नीतिशास्त्राचा इतिहास' हे पुस्तक प्रा. मे. पुं. रेगे यांनी लिहिले आहे. या ग्रंथात रेगे लिहितात की, पश्चिमी देशात प्रशासनात नैतिक मन्वंतराचा कालखंड प्राचीन ग्रीक समाजाच्या इतिहासात शोधावा लागतो. इसवीसनपूर्व पाचव्या शतकाच्या आसपास सॉक्रेटीसच्या जीवनाचे नाट्य या मन्वंतराच्या पार्श्वभूमीवरच घडले. सॉक्रेटीसच्याही अगोदर सोफीस्ट परंपरेतल्या विचारवंतांनी 'सद्‌गुणाचे स्वरूप काय?' माणसाने सद्‌गुणी असावे म्हणजे प्रत्यक्षात नेमके कसे असावे? नगरराज्याचे स्वास्थ्य कशात असते? या व यासारख्या अनेक प्रश्नांची उत्तरे देण्याचे काम केले. सोफीस्ट ही स्वतंत्र विचारप्रणालीच होती. आजच्या काळातील 'भ्रमणव्याख्यानमालेसारखे' काहीसे तिचे स्वरूप होते. त्या काळात ग्रीसमध्ये छोटी-छोटी नगरराज्ये होती. लोकांना शासनाच्या कार्यात प्रत्यक्षपणे सहभागी होता येत असे. नगरराज्यात यशस्वीपणे जगायला, सत्ता कमवायला जे कौशल्य अंगी असावे लागते त्याला शील (virtue) असे म्हटले जाई आणि असे कौशल्य आपण शिकवू शकतो असा सोफिस्टांचा दावा होता. अर्थात सोफिस्टांची अनेक मते पुढे जाऊन सॉक्रेटिस, प्लेटो यांनी खोडून काढली ही बाब वेगळी, पण राजकारण, प्रशासन आणि समाजात नीतिमूल्यांच्या रुजवणुकीमध्ये त्यांचा बहुमोल वाटा होता हे नाकारता येणार नाही. सॉक्रेटिसचे संबंध जीवन हे तर नैतिकतेचे आदर्श वस्तुपाठच होते. आपली पूर्ण हयात नीतिमूल्यांच्या पेरणीसाठी खर्च केलेल्या या साधकाने अखेर नीतिच्या संरक्षणासाठीच प्लेटो व मित्रमंडळाने दूर सुरक्षित पळून जाण्याची जय्यत तयारी केली असतानाही राज्याचे कायदे, परंपरा व संकेताचा आदर म्हणून आणि आपल्या विचारांवर ठाम निष्ठा असल्यामुळे देहदंडाची शिक्षा भोगणे पसंत केले.

यानंतर नैतिकतेच्या संदर्भात रोमन

कालखंडांचा उल्लेख महत्त्वाचा ठरतो. रोमनसंहितेमध्ये नीतिमूल्यांचीच पाझरण झाली आहे. रोमनांनी आपल्या कारकिर्दीमध्ये नियम, नीतिमूल्ये, कायदे यांच्या काटेकोर पालनास अत्यंतिक महत्त्व दिल्याचे पुरावे इतिहासात सापडतात. प्रजासत्ताक गणराज्याच्या स्थापनेसाठी सर्वंकष राजेशाहीविरुद्ध झालेल्या राज्यक्रांत्यांचा उल्लेखही नैतिकमूल्यांच्या संवर्धना संदर्भात करणे महत्त्वाचे ठरते. उदा. १६८८ ची इंग्लंड मधील वैभवशाली क्रांती, १७७६ ची अमेरिकन राज्यक्रांती, १७८९ ची फ्रेंच राज्यक्रांती, १९१७ ची जुलमी झारविरुद्धची बोल्शेव्हिक क्रांती, या राज्यक्रांत्यांनी न्याय, स्वातंत्र्य, समानता, बंधूता, सहिष्णुता या स्वयंसिद्ध मूल्यांना जगभर प्रतिष्ठा मिळवून दिली. लोकनेता व प्रशासक आधुनिक लोकतंत्रात्मक युगात या मूल्यांचा अव्हेर करू शकत नाही. कारण सामान्य जनतेला ती प्रिय असतात.

दुसऱ्या महायुद्धानंतर प्रगत पाश्चिमात्त्य देशात संविधानातच नैतिकतेला अग्रगण्य स्थान देण्यात आले आहे. ब्रिटन, फ्रान्स, अमेरिका, जर्मनी, स्वित्झरलँड या देशात आचारसंहितेच्या माध्यमातून लोकप्रशासनात नैतिकता प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला जातो आहे. अमेरिकेसारख्या देशात ६० च्या दशकापासूनच लोकप्रशासनात नैतिकतेचा गांभिर्याने विचार केला जाऊ लागला. विलसोनियन वैधानिकतेच्या तत्त्वज्ञानात पहिल्यांदा प्रशासनातील नीतिमत्तेवर प्रकाश टाकण्यात आला. याचा सुपरिणाम म्हणून नीतिधिष्ठीत प्रशासनकार्य करणे हे आपले कर्तव्य आहे असे लोकप्रशासकांना वाटू लागले. स्टीलमन यांनी व्यावसायिक नीतिमत्तेचा विचार मांडला. दरम्यान अमेरिकन प्रशासनात काही भ्रष्टाचारासारखी प्रकरणे गाजली त्यामुळे प्रशासनात नीतिमीमांसेची अधिकच गरज भासू लागली. उदा. अध्यक्ष रिचर्ड निक्सन यांच्या कारकिर्दीतील वॉटरगेट प्रकरण, इराण कोन्ट्रा अफेअर आणि वॉल स्ट्रीट - HUD - कॅपीटॉल ही स्कँडल्स इत्यादी. वॉटरगेट प्रकरणात तर अध्यक्ष रीचर्ड निक्सन यांना राजीनामा घ्यावा लागला. अमेरिकेच्या इतिहासातील ती पहिली घटना होती. यामुळे अध्यक्ष जीमी कार्टर यांच्या काळात १९७८ साली Ethics in Government Act - १९७८ पास करण्यात आला. त्यात अमेरिकन जनतेच्या हितसंवर्धनाला सर्वोच्च प्राधान्य देऊन प्रशासकांसाठी आचारसंहिता सांगण्यात आली. १९८० मध्ये American Society for Public Administration (ASPA) या संस्थेने नैतिक संहिता तयार करून प्रशासकीय अधिकारी व कर्मचाऱ्यांचा नैतिक दर्जा उंचावण्याचा कसोशीने प्रयत्न केला. National Association of Schools of Public Affairs and Administration (NASPAA) या संस्थेने शाळा, महाविद्यालयात नीतिमूल्यांची शिकवण विद्यार्थ्यांना देणे किती महत्त्वाचे आहे याकडे अमेरिकन समाजाचे लक्ष वेधले. याचा संयुक्त परिणाम आज असा झाला आहे की अमेरिकेत जबाबदार प्रशासन निर्माण झाले.

पश्चिमी देशात प्रशासनात नैतिकता व जबाबदारी वाढीस लावण्यासाठी अलिकडे अभिनव प्रयोग केले जात आहेत. जसे की, सूर्यास्त विधान (Sunset legislation) झीरो-बेस बजेटिंग (Zero Base Budgeting) सामाजिक लेखापरीक्षण (Social audit) प्रेस स्वातंत्र्यासंबंधी नियम, सूर्योदय विधान (Sunrise legislation) इत्यादी. सूर्यास्त विधान याचा अभिप्राय असा की कोणताही कायदा वा अधिनियम एका विशिष्ट कालावधीपुरता सीमित (Time bound) असला पाहिजे. कारण एका ठरावीक काळानंतर सामाजिक आशा, अपेक्षा आणि मागण्यांत बदल होत असतो. यामुळे कोणताही कायदा हा काळाचे प्रतिनिधित्व करणारा असला पाहिजे, यासाठी ठरावीक अवधीनंतर त्याचे पुनर्समीक्षण होणे अनिवार्य असते. सूर्योदय विधान म्हणजे कायदेमंडळ व प्रशासकांनी जनहितासंबंधीचा निर्णय बंद दरवाजाआड घेता कामा नये तर तो खुल्या पद्धतीने घ्यावा. अमेरिकेसारख्या देशात मीडिया स्वातंत्र्याला सर्वाधिक महत्त्व आहे. ठरावीक कालावधीनंतर शासन व्यवहाराशी संबंधित असलेली गुप्त कागदपत्रे, ठराव, अहवाल प्रसिद्धी

माध्यमांना छापण्यासाठी दिले जातात. यामुळे तत्कालीन प्रशासक, धोरणनिर्मात्यांचा प्रासंगिक घटनेकडे पाहण्याचा दृष्टिकोण वाचकाला समजतो.

औद्योगिकदृष्ट्या प्रगत समजल्या जाणाऱ्या कॅनडा, ब्रिटन, जर्मनी, फ्रान्स, नेदरलँड, ऑस्ट्रेलिया या पाश्चिमात्त्य देशांत विविध मार्गांनी प्रशासनात नीतिमत्ता, जबाबदारी, उत्तरदायित्व, एकता, तटस्थता, निःपक्षपाती-पणा, सदिच्छा निर्माण करण्याचा प्रयत्न ८० च्या दशकापासून विशेषत्वाने केला जातो आहे. जागतिकीकरणाच्या आजच्या युगात नैतिकमूल्यांच्या आदर्शात्मक आशयाचे परावर्तन बाजारमूल्यात होत आहे. उत्पादकता, कार्यक्षमता, मूल्यप्रभावणता, स्पर्धात्मकता, नफेखोरी इत्यादी अर्थव्यवस्थेशी संबंधित असलेल्या नीतिमूल्यांनी प्रशासनाला प्रभावित केले आहे.

## लोकप्रशासनातील नैतिकतेचा भारतीय संदर्भ

भारतात प्रशासनात नैतिकतेचा विचार फार प्राचीन काळापासून झाला आहे. प्रशासनात नैतिकतेच्या उदयाची मुळे भारतातील समृद्ध पारंपरिक वारशात शोधावी लागतात. विविध धर्मग्रंथ, महाकाव्ये, वेद, उपनिषदे यात मानवाला सर्वोत्तम जीवन जगण्यासाठी नैतिक हितोपदेश करण्यात आला आहे. या प्राचीन भारतीय साहित्यात व्यक्तिहित आणि समाजहित यात समन्वय घडवून आणण्यात आला आहे. प्राचीन भारतात नैतिकतेचा व्यापक विचार 'धर्म' (Dharma) या संकल्पनेत करण्यात आला. प्रत्येक व्यक्तीच्या जीवनाचे अंतिक गन्तव्य म्हणजे मोक्षप्राप्ती असले पाहिजे अशी त्यावेळी एक धारणा होती. (आत्मानो मोक्षार्थ) परंतु असे असले तरी सर्वांचे कल्याण साध्य करण्याचा प्रयत्न करणे हे देखील प्रत्येकाची नैतिक जबाबदारी मानण्यात आली होती. (जगतहिताचाय) न्यायमूर्ती एम. रामा यांनी श्री. भाऊराव देवराव व्याख्यान मालेत 'Reforming our polity on the basis of Dharma' या विषयावर दिलेल्या भाषणात प्राचीन धर्म या संकल्पनेतील नीतिविचारावर सुंदर मांडणी केली आहे. त्याच्या मते, प्राचीन भारतीय साहित्यात समाजहितापुढे व्यक्तिहितास गौण स्थान देण्यात आले आहे. यासाठी मित्रलाभातील हितोपदेशाकडे ते लक्ष वेधतात.

त्यजेत् एकं कुलस्यार्थे, ग्रामस्यार्थे कुलं त्यजेत्।।
ग्रामं जनपदस्यार्थे आत्मार्थे पृथ्विं त्यजेत्।।

कुळाच्या रक्षणासाठी कुटुंबातील गैरवर्तनी एखाद्या व्यक्तीचा त्याग करण्याची वेळ आली तर जरूर करावा. त्याचप्रमाणे गावाच्या रक्षणासाठी कुळाचा त्याग करण्याची वेळ आली तरी यत्किंचितही डगमगू नये. जनपदासाठी गावाचा आणि आत्म्यासाठी सबंध विश्वाचा त्याग करण्याची वेळ आली तरी त्याचा अवश्य त्याग करावा. येथे 'आत्मा' हा शब्द 'सार्वत्रिक चांगुलपणा' या अर्थाने घेण्यास काही हरकत नसावी. भारतीय अध्यात्माचा केंद्रबिंदू असणाऱ्या भगवद्गीतेत याच आशयाचे एक वचन आहे.

स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः।।

स्वातंत्र्योत्तर काळात या समृद्ध सांस्कृतिक वारशाच्या पार्श्वभूमीवर भारतीय संविधानाची निर्मिती करण्यात आली. संविधानाच्या मूलभूत कर्तव्यात सार्वजनिक नीतिमत्ता विशद करण्यात आली आहे. दुर्दैवाने ही कर्तव्ये किती लोकांना ज्ञात आहेत हा गंभीर प्रश्न आहे. भारतातील समाज सुधारकांनीही सुसंस्कृत नीतिमान पिढी घडविण्याचा प्रयत्न केला आहे. त्यात, गोखले, न्या. रानडे, विठ्ठल रामजी शिंदे, डॉ. आंबेडकर, जयप्रकाश नारायण यांचा विचार करावा लागतो. लोकनायक जयप्रकाशांनी संपूर्ण क्रांतीची सैद्धांतिक मांडणी करताना नीतिमत्तेला श्रेष्ठ स्थान दिले होते. शाहू-फुल्यांचे जीवन नैतिकतेला समर्पित होते. शासकीय पातळीवरही कार्यक्षम नीतिमान व जबाबदार प्रशासनाच्या निर्मितीसाठी स्वातंत्र्योत्तर काळात विशेष प्रयत्न करण्यात आले आहेत. १९९६ साली भारत सरकारने कार्यक्षम व जबाबदार प्रशासनाच्या निर्मितीसाठी उच्च सचिवांची परिषद आयोजित केली होती. जबाबदार उत्तरदायी, पारदर्शक, विकेंद्रित आणि पीपल फ्रेंडली प्रशासनाची निर्मिती करणे हा त्यामागील मुख्य उद्देश होता. त्यानंतर सातत्यपूर्ण झालेल्या

विचारमंथनामधून Dept. of Administrative Reforms and Public Services या विभागाने स्वतंत्र ॲक्शन प्लॅन तयार केला. त्यात पुढील बाबी होत्या.

१) नागरी सनद आणि उत्तरदायित्वपूर्ण प्रशासन (एच.डी.शौरी व ग्राहक समन्वय समिती यांच्या संयुक्त पुढाकारातून पुढे नागरी सनदेची रचना करण्यात आली.)
२) प्रभावी व जलद लोकतक्रार निवारण.
३) ग्रामीण व शहरी भागातील लोकनिर्वाचित संस्थांचे (bodies) सबलीकरण आणि सेवांचे विकेंद्रीकरण.
४) कायदे, नियम आणि प्रक्रियांचे पुनरावलोकन.
५) पारदर्शकता व माहितीचा अधिकार.
६) लोकसेवकांसाठी नैतिकतेची आचारसंहिता.
७) भ्रष्टाचार निर्मूलन आणि स्वच्छ प्रशासन.
८) कार्यकाळाची स्थिरता (Stability of tenure) आणि नागरी सेवा बोर्डसाठी योजना.

याशिवाय जिल्हा तक्रार निवारण समित्या, सरकार आपके द्वार, खुला दरबार, Sangat Darshan या माध्यमातून भारतात स्वच्छ, पारदर्शक व जबाबदार प्रशासन वाढीचे प्रयत्न केले जात आहेत. IAS दर्जाच्या सनदी अधिकाऱ्यांनी स्वतः पुढाकार घेऊन आपल्यासाठी स्वतंत्र नीतिनियमांवर आधारित आचारसंहिता तयार केली आहे. त्याचाही लाभ होतो आहे.

### लोकप्रशासनातील नैतिकतेचा व्यावहारिक आशय

लोकप्रशासनातील नैतिकतेचा सैद्धांतिक आशय एकदा का लक्षात आला की मग यातून दुसरा प्रश्न निर्माण होतो. प्रत्यक्षात व्यक्ती, समाज आणि संस्थागत पातळीवर नीतिमत्तेचे अस्तित्व आहे काय? या प्रश्नाचे उत्तर मध्यममार्गी आहे, म्हणजे नैतिकतेचा आविष्कार आहे परंतु अगदीच मर्यादित, तोकडा. आपण नेहमी असे म्हणत असतो की भारतीय प्रशासनातील नैतिकतेची बैठक ही धार्मिक व आध्यात्मिक आहे. परंतु हे अर्धसत्य आहे. भारतीय समाजाची परंपरेने चालत आलेली बैठक ही जरूर धार्मिक असेल वा येथील राज्ये, साम्राज्ये एक काळ कट्टर धर्मसत्ता होत्या असे विधान करता येईल पण त्या इहवादी नव्हत्या. अखेर या सर्वांच्या पलीकडे एव्हाना आधुनिक काळातील संविधानाच्या चौकटीपलीकडे व्यक्ती स्वतंत्र भूमिका पार पाडत असते. ते त्याचे खाजगी जीवन असते. ज्याला आपण लोकव्यवहार असे म्हणतो. यासाठी व्यक्ती स्वतंत्र असते. या धारणेचे वेगळेपण असे की हा व्यवहार व्यक्ती एकेकट्याने ठरवितात. यामुळे माणसांच्या योग्य-अयोग्य, चांगले-वाईट, उदात्त-अनुदात्त, न्याय-अन्याय, नीति-अनीति याबाबतच्या धोरणात फरक असू शकतो. लोकव्यवहाराचा सार्वत्रिक सिद्धांत म्हणून माणसे कृती करताना स्वतःच्या इच्छा-आकांक्षा, स्वसुख, स्वअभ्युदय, स्वलाभ यांना सर्वाधिक महत्त्व देणे अटळ आहे. कारण तीच मानवी स्वभावप्रकृती आहे. आजच्या शिष्टमान्य व्यक्तिवादी, इहवादी भूमिकेत हे सारे अनुस्यूत आहे. मग या अर्थाने पालक आपल्या मुलीसाठी हुंडा देतो तर मुलासाठी घेऊही शकतो. साहेबांच्या टेबलवर फाईल तशीच धूळ खात पडली असेल तर त्यावर वजन (पैसा) टाकून ती पुढेही सरकू शकतो. कुटुंबियांच्या कल्याणासाठी प्रशासक भ्रष्टाचार करू शकतो. आपल्या सात पिढ्यापर्यंतची आपण तरतूद करून ठेवलीय असे खासगीत मित्रांशी वार्तालाप करताना निर्लज्जपणे सांगू शकतो. मोक्याच्या पदावर आपल्या नातलगांची वर्णी लावू शकतो व मालदार कॉंट्रॅक्टस आपल्या नातेवाईकांना, मित्रांना प्रशासक देऊ शकतो. (भाईभतिजावाद) आज भारतीय लोकजीवनात हे राजरोसपणे सुरू आहे.

सैद्धांतिकदृष्ट्या एकीकडे आपण प्रशासनासाठी नैतिकतेची दर्जेदार चौकट निर्माण केलीय पण प्रत्यक्ष व्यवहाराचा जेव्हा आपण अनुभव घेत असतो तेव्हा मात्र प्रचंड नैराश्य येते. आत्मविश्वास खचल्यासारखा वाटतो. त्याची जागा न्यूनगंडाने,

हतबलतेने घेण्यास सुरुवात होते. हे सर्व थांबले पाहिजे असे म्हणणाऱ्यांची संख्या या देशात कमी नाही पण कृतीशून्य आहे. कोणत्याही अपप्रवृत्तीविरुद्ध चालविलेल्या चळवळीच्या अग्रभागी वंचिततेचे चटके बसलेला सामान्य माणूसच असतो. पण त्यांना मार्गदर्शन करणारा पांढरपेशा मध्यमवर्गही तितकाच जागरूक व कृतीउन्मुख असावा लागतो. एक काळ याच मध्यमवर्गाने भारताला ब्रिटिशांच्या जोखडातून मुक्त करण्यासाठी सामान्य माणसाला संघटित केले होते. जगातील यच्चयावत क्रांत्यांना याच मध्यमवर्गाने मार्गदर्शन केले आहे. परंतु हाच मध्यमवर्ग आज संवेदनाहीन, बधिर झाला आहे. तो स्वतःपुरते, आपल्या कुटुंबियांपुरतेच पाहतो आहे.

लोकनायक जयप्रकाश नारायण यांनी नागरी स्वातंत्र्यासाठी लोकसंघटन (PUCL) या कार्यक्रमाद्वारे जनमानसात आशा पल्लवीत केल्या होत्या पण येथील राजकीय नेतृत्वाने सूडापोटी त्या चिरडून टाकल्या. महाराष्ट्रात राळेगण-सिद्धीचा कायापालट घडवून आणणाऱ्या आदरणीय श्री. अण्णा हजारे यांनी भ्रष्टाचार निर्मूलन मोहीम सुरू करून अनेक वर्षे लोटली. तालुका, जिल्हा पातळीवर समित्यांचे संघटनही झाले. प्रा. ग. प्र. प्रधान, डॉ. बाबा आढाव, श्री. अविनाश धर्माधिकारी यासारख्या मातब्बर व्यक्ती काही कालखंड त्यासाठी धावून गेलेल्याही दिसल्या. मिडीयाने या चळवळीला उचलून धरले. आता महाराष्ट्रव्यापी सुसंघटित, प्रशिक्षित यंत्रणेद्वारे लवकरच प्रशासनातील, शासकीय खात्यातील भ्रष्टाचार निपटून काढला जाईल असे आशादायी विलक्षण उत्तेजक वातावरण निर्माण झालेले आपण अनुभवले. पण भ्रष्टाचार समाप्त झाला का? खुद्द अण्णांनी एका मुलाखतीत, 'संघटनेच्या कामाने गती पकडली नाही, काटकसरीने चळवळ चालविण्यासाठी देखील जेवढे पैसे लागतात तेवढेही आमच्याकडे नाहीत' असे नैराश्योद्‌गार काढले होते. मग शंका येऊ लागली आहे की, कर्तव्य, नैतिकता, निस्वार्थता, सर्वांचे हित, इतरांचे अधिकार, त्याग, सेवा, आपुलकी या दुबळ्या कर्तृत्वहीन, आळशी, चुकार माणसांच्या तर धारणा नसाव्यात. आपण बलवान असू तर आपली भरभराट, उन्नती करू शकू तरच आपल्यासहित कुटुंबियांना सुखांचे जीवन जगता येईल. कौटिल्य, मॅकेव्हली, हॉब्ज यांनी हेच तर सांगितले आहे. तेव्हा नीति-अनितीच्या गोष्टी पुराणातच शोभून दिसतात. यासारख्या स्वार्थापोटी प्रस्तुत केलेल्या संकल्पना जेव्हा मानवी मनःकृतीची पकड घ्यायला लागतात तेव्हा समाजाचे भवितव्य अंधःकारमय आहे असे म्हणावे लागेल. मग यातून स्वाभाविकपणे प्रश्न निर्माण होतो, बाहेर पडण्याचा मार्ग काय?

उपरोक्त चर्चेतून असा एक निष्कर्ष काढला जाण्याची शक्यता आहे की, आज आपण अशा अवस्थेला येऊन पोहोचलो आहोत की, प्रशासनातील भ्रष्टाचार, लालफीत वाद, भाईभतीजावाद निपटून काढण्याचा कितीही प्रयत्न केला तरी त्याला यश मिळणार नाही. या अपप्रवृत्ती प्रशासनाच्या पातळीवर इतक्या खोलावर पसरल्या की नीतिविचारांच्या क्षेत्रातच लोकमानस संभ्रम, द्विधा मनःस्थिती व संशयाच्या भोवऱ्यात अडकला आहे. या ठिकाणी एक बाब लक्षात घेण्यासारखी आहे की, इतिहासाच्या पानांवर जरा नजर फिरविली आपल्या लक्षात येते की, प्रत्येक कालखंडात संक्रमणावस्थेनंतर सामाजिक जीवनात शांतता, स्थिरता, समृद्धी आली आहे. अजूनही अशा मन्वंतराची अपेक्षा धरायला काहीच हरकत नाही. पण ही धुरा कोणी आपल्या अंगाखांद्यावर घ्यावी हाच खरा प्रश्न आहे. स्वाभाविकपणे विचारवंत, सुधारक, स्वतः प्रशासक, सामान्य व्यक्ती, नेते आणि सर्वात महत्त्वाचे म्हणजे तरुण यांनी. तारुण्य हे सळसळते चैतन्य असते, उद्याच्या नागरी संस्कृतीचा तो मुख्य आधारस्तंभ असतो. या अफाट ऊर्जेला विधायकतेकडे वळविता आले तर देशाचे सोने होईल. स्वामी विवेकानंदानी तारुण्य स्फुल्लिंग जाणले होते म्हणूनच राष्ट्र बांधणीत तरुणांचा वाटा, सहभाग त्यांना महत्त्वपूर्ण वाटत होता. योग्य वेळी योग्य वयात त्यांच्यावर नीतिमूल्यांची रुजवण करून अप्रवृत्तींना आळा घालता येऊ शकेल.

समाजातला विवेक जोपर्यंत जागा होत नाही

तोपर्यंत या अपप्रवृत्तींना आळा बसणार नाही. प्रशासनात नीतिमूल्यांची रुजवण एककलमी (एकमार्गी) करून चालणार नाही. कारण व्यक्ती वर्तन इतके कमालीचे गुंतागुंतीचे असते की त्याच्या प्रेरणा सामाजिक, आर्थिक, राजकीय, सांस्कृतिक अशा सर्वच व्यवस्थात दडलेल्या असतात. त्यामुळे लोकनायक जयप्रकाश नारायण यांसारखे समग्र पातळीवरून प्रयत्न करावे लागतील. भारतीय समाजाचे पुनरुत्थान शक्य व्हावयाचे असेल, तो एकसंघ, नैतिक बनावयाचा असेल तर प्राचीन काळापासून अध्यात्म चळवळीमधून चालत आलेली वैचारिक परंपरा आणि आधुनिक कालसंगत नीतिविचार यात संवाद घडवून आणावा लागेल. यासाठी जात-धर्म निरपेक्ष नेतृत्वाची नितांत गरज राहील. दुर्दैवाने अलिकडे त्याची उणीव भासत आहे. महात्मा गांधींसारख्या स्वच्छ, चारित्र्यसंपन्न आणि विचार व आचरण यात साम्य असणाऱ्या आणि डॉ. आंबेडकरांसारख्या प्रकांड पांडित्य व जनपक्षसुधारणांची तळमळ असणाऱ्या लोकनेत्याची आज गरज आहे. डॉ. खैरनार सारख्या निःस्पृह, धाडशी प्रशासकांची आवश्यकता आहे. टी. एन. शेषन सारख्या लोकशाहीला दिशा देणाऱ्या प्रशासकांची निकड आहे. अरुण भाटियांसारख्या कर्तव्यदक्ष अधिकाऱ्याची गरज आहे. बुद्धिनिष्ठ विवेकवादी जनसागरांची नितांत आवश्यकता आहे. असे प्रशासक, लोकनेते व जनसमूह निर्माण होईल व या देशाला एका उच्च नैतिक पातळीवर घेऊन जाईल अशी आशा करू या.



## संदर्भ सूची


१) Donald C. Menzel, University of South Florida. Teaching Ethics and Values in Public Administration -

२) Paper presented by N. Vittal at ISTM, New Delhi. Ethics in Administration.

३) Sangeeta Sharma - Administrative Ethics : A Road Ahead - IJPA, April-June 2004 Vol. 2.

४) S. C. Arora - Responsible Bureaucracy - IJPA, April-June 2007.

५) Terry L. Coopar, Ethics Education in Public Administration - Hand-book of Administrative Ethics, Newyork.

६) M. Shamsul Hayue, Relationship between citizenship and Public Administration : a reconfiguration - National University of Singapore.

७) Vaishali Saxena, Moral Building Strategies - Bureaucracy on Wheels. Aalekh Publishers, Jaipur.

८) Encyclopaedia of Social Sciences - Diamond Pub., Pune.

९) Dr. Prabhudatt Sharma and Harishchandra Sharma, Theory and Practice of Public Administration - CBD, Pub. Jaipur

१०) डॉ. महादेवप्रसाद शर्मा, डॉ. बी. एल. सडाना - लोकप्रशासन : सिद्धान्त एवं व्यवहार - किताब महल पब्लिशर्स, इलाहाबाद.

११) विष्णु भगवान, विद्याभूषण - लोकप्रशासन के सिद्धान्त - एस. चांद ॲण्ड कंपनी लि. नई दिल्ली.

१२) डॉ. सर्जेराव साळुंखे, समाजशास्त्रातील मूलभूत संकल्पना - नरेंद्र प्रकाशन, पुणे.

१३) डॉ. सौ. किरण नागतोडे, नैतिकमूल्य शिक्षण - विद्या प्रकाशन, नागपूर.

१४) वसंत पळशीकर, भ्रष्टाचार निर्मूलनाचे आव्हान आणि नीतिमीमांसेची निकड - नवभारत - १९९९.

१५) स. मा. गर्गे - भारतीय समाजविज्ञान कोश - समाजविज्ञान मंडळ, पुणे.

१६) सार्वजनिक नीतिमत्ता - सत्याग्रही सप्टें. १९९८ संपादकीय.




# ‘स्थितप्रज्ञस्य का भाषा...’ गीता २.५४

प्रा० म० अ० मेहेंदळे

भगवद्गीतेच्या दुसऱ्या अध्यायात ज्यांचा शोक करू नये अशा गोष्टींबद्दल शोक करत बसणाऱ्या आणि त्याचवेळी शहाणपणाच्या गोष्टी सांगणाऱ्या अर्जुनाला त्याने धर्मयुद्ध करणेच कसे श्रेयस्कर आहे हे नानापरींनी कृष्णाने समजावून सांगितले. अखेरीस कृष्णाने अर्जुनाला सांगितले की त्याची बुद्धि श्रुतीतल्या वाक्यांनी चंचल झाली आहे. ती जेव्हा समाधिस्थितीत निश्चल राहील तेव्हा त्याला योगाची प्राप्ति होईल (२.५३). त्यावेळी अर्जुनाने त्याला साहजिकच विचारले : स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव "स्थितप्रज्ञ किंवा समाधिस्थ कोणाला म्हणावे?" यानंतर त्याने आणखी विचारले : स्थितधीः किं प्रभाषेत, किमासीत, व्रजेत किम्.

श्लोकाच्या दुसऱ्या पंक्तीचा फार चुकीचा अर्थ आजवर करण्यात आला आहे. त्याची सुरुवात शंकराचार्यांनी केली. त्यांनी वरील श्लोकातल्या ‘किम्’चा अर्थ ‘कथम्’ असा केला. म्हणजे श्लोकाचा अर्थ होतो "स्थितधी (म्हणजेच स्थितप्रज्ञ) बोलतो कसा, बसतो कसा, चालतो कसा?" या अर्थाचे हे प्रश्न खुळचट वाटतात, कारण स्थितप्रज्ञ झाला तरी तो इतर चारचौघांसारखाच बोलणार, बसणार किंवा चालणार. स्थितप्रज्ञ झाला म्हणून तो काही आपले विचार दुसऱ्याला कळविण्यासाठी भाषेचा वापर करण्याऐवजी करपल्लवी वगैरे करू लागणार नव्हता, किंवा बसण्यासाठी काही निराळी पद्धत शोधून काढणार नव्हता, आणि पायांनी चालायच्या ऐवजी हातावर चालू लागणार नव्हता. हे सर्व तो इतरांसारखेच करणार होता. गीतेतला अर्जुन बुद्धिमान आहे. प्रसंगी "अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः। कथमेतद् विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति (४.४)", किंवा "ज्यायसी चेत् कर्मणस्ते मता बुद्धिर्जनार्दन। तत् किं कर्मणि घोरे मां नियोजयति केशव।। (३.१)" असे प्रश्न तो कृष्णाला विचारू शकत होता. तेव्हा स्थितप्रज्ञ ‘बोलेल कसा, बसेल कसा, चालेल कसा’ असे बालिश प्रश्न तो कृष्णाला विचारणे शक्य नाही.

वरील पंक्तीचा अर्थ नीट समजण्यासाठी तिच्या शेवटाकडून सुरुवात करणे इष्ट आहे. ‘व्रजेत किम्’चा अर्थ तो ‘चालेल कसा?’ असा होणार नाही, कारण ‘व्रज्’ धातूचा अर्थ ‘चालणे (wander)’ असा नाही. ‘चालणे, नुसते हिंडणे फिरणे’ या अर्थी संस्कृतमध्ये ‘चर्’ धातूचा उपयोग होतो ऐतरेय ब्राह्मणातील प्रसिद्ध हरिश्चंद्र कथेत इंद्र रोहिताला वारंवार ‘चरैव’ असे सांगतो. (ऐ. ब्रा. ७. १३–१६). त्याचा अर्थ ‘हिंड, फिर’; ‘अमुक ठिकाणाहून निघून अमुक ठिकाणी जा’ असा अर्थ चर् धातूचा नाही. हा अर्थ ‘व्रज्’ धातूला आहे. ‘व्रज्, गम्’ या धातूंचा ‘जाणे’ (go to) असा अर्थ आहे, नुसते चालणे असा नाही. तेव्हा प्रस्तुत श्लोकात अर्जुन जेव्हा कृष्णाला विचारतो ‘(स्थितप्रज्ञः) व्रजेत किम्’ तेव्हा त्याला विचारायचे असते. ‘स्थितप्रज्ञ कुठे निघून जाईल का?’ म्हणजे स्थितप्रज्ञ झालेला मनुष्य गृहस्थाश्रम सोडून वानप्रस्थाश्रम स्वीकारण्यासाठी ‘(वनात) जाईल का’ असे त्याला कृष्णाला विचारायचे आहे.

‘व्रजेत किम्’चा अर्थ ‘कुठे (वनात) निघून जाईल का?’ असा निश्चित झाल्यावर मग त्याच्या मागच्या ‘किमासीत’ या प्रश्नाचा अर्थ लक्षात येतो. स्थितप्रज्ञ अवस्था प्राप्त झालेला मनुष्य ‘(घरीच) बसेल की, (वनात जाईल)’ असे अर्जुन विचारीत आहे.






'गृहस्थ' या शब्दात 'स्था'चा अर्थ नुसता 'उभे राहणे' असा नसून लक्षणेने 'राहणे' असा ज्याप्रमाणे आहे, तसाच प्रस्तुत लोकात 'आस्' धातूचा अर्थ नुसता 'बसणे' असा अर्थ नसून 'राहणे' असा आहे. अर्जुनाच्या म्हणण्याचा रोख असा आहे की, स्थितप्रज्ञ पूर्वीप्रमाणेच घरी राहील (गृहस्थाश्रमात होता तसाच), का घरदार सोडून तो वानप्रस्थाश्रम स्वीकारील? (किमासीत, व्रजेत किम्).

गीतेतल्या लोकाच्या चौथ्या चरणाचा अर्थ स्पष्ट झाल्यावर तिसऱ्या चरणातला 'स्थितधीः किं प्रभाषेत' या प्रश्नाचा अर्थही लक्षात येतो. त्याचा अर्थ 'स्थितप्रज्ञ बोलेल कसा?' असा नाही. चौथ्या चरणात दोन विरोधी अर्थाचे प्रश्न आहेत (किम् आसीत, किम् व्रजेत), तसेच तिसऱ्या चरणातही दोन विरोधी अर्थाचे प्रश्न अभिप्रेत आहेत, एक प्रश्न शब्दांनी स्पष्टपणे व्यक्त झाला आहे, दुसरा, तद्विरोधी अर्थाचा सहज लक्षात येण्यासारखा आहे. अर्जुन कृष्णाला विचारतो : "स्थितप्रज्ञ (पूर्वीप्रमाणेच इतर लोकांशी) बोलेल (की मौन धारण करेल?)" अर्जुनाच्या मनात अशी शंका निर्माण होते की एकदा स्थितप्रज्ञ या अवस्थेतत माणूस पोचला की इतर चारचौघांशी नेहमीप्रमाणे तो बोलेल, की न बोलता मौनव्रत पाळेल? म्हणून त्याने कृष्णाकडून खुलासा मागितला आहे.

अशा प्रकारे श्लोकाच्या दुसऱ्या अर्धाचा वास्तविक, संदर्भानुसार योग्य, असा अर्थ केला म्हणजे असे प्रश्न अर्जुन कृष्णाला विचारतो हे पटते. आपल्या लक्षात येते की श्लोकाचा असा अर्थ करताना 'किम्' या प्रश्नार्थक सर्वनामाचा एरवी जसा उपयोग होतो तसाच इथे आहे, 'किम्' म्हणजे 'कथम्' अशी त्याच्या अर्थाची ओढाताण करण्याचे कारण नाही.

'स्थितधीः किं प्रभाषेत .....' इत्यादि प्रश्नांचा पूर्वापार चालत आलेला अर्थ स्वीकारला तर कृष्णाने त्याच्या उत्तरात त्या प्रश्नांची अजिबात दखल घेतली नाही असे होते. कारण स्थितप्रज्ञ 'बोलेल कसा, बसेल कसा, चालेल कसा' हे कृष्णाने अर्जुनाला सांगितले नाही.

परंतु कृष्णावरती असा आरोप करण्याचे कारण नाही. प्रस्तुत लेखात अर्जुनाच्या प्रश्नांचा वास्तविक अर्थ सांगितला आहे तो ध्यानी घेतला की कृष्णाने अर्जुनाच्या सर्व प्रश्नांचे उत्तर दिले आहे हे लक्षात येते. कृष्णाच्या उत्तराचे गीतेत जे एकंदर अठरा श्लोक आहेत (२.५५-७२) त्यांची रचना अशी आहे : उत्तराच्या पहिल्या तीन श्लोकात (५५-५७) कृष्णाने स्थितप्रज्ञ अथवा स्थितधी यांची लक्षणे सांगितली आहेत. नंतर 'यदा संहरते चायं....' अशी सुरुवात करून 'तस्माद्यस्य महाबाहो....' या श्लोकापर्यंत म्हणजे एकूण अकरा श्लोकांत (५८-६८) कृष्णाने स्थितप्रज्ञ होण्यासाठी इंद्रिय निग्रहाची कशी आवश्यकता आहे ते अर्जुनाच्या मनावर ठसविले आहे. शेवटच्या चार श्लोकांत (६९-७२) कृष्णाने अर्जुनाच्या 'स्थितधीः किं प्रभाषेत.....' इत्यादि प्रश्नांचे उत्तर दिले आहे. तो म्हणतो स्थितप्रज्ञ झालेला माणूस घर सोडून वनात वगैरे कुठे जात नाही, तो आहे तिथेच असतो आणि पूर्वीसारखाच वागतो,[२] फक्त आता त्याची सर्व कामे निःस्पृहपणे, फलेच्छा सोडून होतात, तो निर्मम, निरहंकार असतो, इतर सामान्य माणसांसारखा तो सकाम असत नाही. अशा स्थितप्रज्ञाला जी शान्ति मिळते तिला ब्राह्मी स्थिति म्हणतात. अशी ब्राह्मी स्थिति प्राप्त झालेला स्थितप्रज्ञ माणूस पुन्हा कधी मोहात पडत नाही, अखेरपर्यंत त्या स्थितीत असताना तो शेवटी ब्रह्मनिर्वाणाप्रत जातो (नैनां प्राप्य विमुह्यति।। स्थित्वास्यामन्तकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति। ७२). स्थितप्रज्ञ वनात जात नाही, ब्रह्मनिर्वाणाकडे जातो. अर्जुनाच्या प्रश्नातल्या 'व्रज्' या धातू ऐवजी कृष्णाने 'ऋ (ऋच्छति)' या त्याच अर्थाच्या धातूचा उपयोग केला आहे. अशा तऱ्हेने कृष्णाने अर्जुनाच्या सर्व प्रश्नांची उत्तरे दिली आहेत.









अनुक्रमणिका

**तळटीपा :**

१. या श्लोकाचा शेवट योग्य वाटत नाही. कृष्णाच्या उत्तरातल्या पहिल्या श्लोकात गौण वाक्यात 'यदा' शब्द आहे (प्रजहाति यदा कामान्). त्यास अनुलक्षून मुख्य वाक्यात 'तदा' शब्द आला आहे (स्थितप्रज्ञस्तदोच्यते). तेव्हा 'यदा संहरते चायं' अशी वाक्यांची सुरुवात केल्यावर त्या वाक्याचा शेवट 'स्थितप्रज्ञस्तदोच्यते' असा हवा होता. खेरीज श्लोकातल्या गौणवाक्यात 'अयं' हे सर्वनामरूप आहे तेव्हा मुख्य वाक्यात 'अस्य' हवे, 'तस्य' नको. परंतु या आधीच्या श्लोकाचा शेवट 'तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता' असा झाला आहे, त्याच्या साहचर्याने प्रस्तुत श्लोकाचाही शेवट तसाच केला आहे. २.६१ आणि २.६८ या दोन श्लोकांत 'तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता' असे शेवटी आढळते. ह्या दोन श्लोकांचा पूर्वार्धात 'यस्य' आहे, 'यदा' नाही तेव्हा तिथला शेवट योग्य आहे.

२. हाच अर्थ पुढे 'सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वन्ति भारत। कुर्याद्विद्वांस्तथासक्तः .....' (३.२५) या श्लोकात सांगितला आहे. अविद्वान जसे वागतो तसेच विद्वान वागतो, फक्त कामे करताना तो असक्त असतो.

⏮⏭

# संगीत : कला, आस्वाद आणि समीक्षा

प्रा० प्रसन्नकुमार अकलूजकर

(१)

संगीत, साहित्य, नृत्य, शिल्प, चित्र आणि नाट्य या सहा कलांचा समावेश 'ललितकला' या सदराखाली होतो. त्यातही संगीत, नृत्य आणि नाट्य या तीन कला प्रयोगजीवी किंवा प्रयोगशरण किंवा प्रयोगसिद्ध कला म्हणून ओळखल्या जातात. त्यांचे प्रकटीकरण त्या त्या कलेच्या रंगमंचावरील सादरीकरणातूनच सिद्ध होते. अभियनकला ही नाट्य आणि नृत्य या दोन कलांमध्ये अंतर्भूत आहे. याचा अर्थ या दोन्ही कला अभिनयाधारित आहेत. रंगमंचीय आविष्कारात नाटकाला शब्दांची गरज असते; म्हणजे नाटक हे वाचिक आणि कायिक अभिनयातूनच सिद्ध होते. नृत्यात शब्द नाहीत. मानवी देह हेच या कलेचे साधन आहे आणि अभिनय हे माध्यम आहे. नृत्याला संगीताची साथ असते. हे संगीत दोन प्रकारचे असते. गायन आणि वादन यांच्या साथीनेच नृत्य रंगमंचावर आविष्कृत होते. भारतीय संगीतात प्रामुख्याने दोन शैली अस्तित्वात आहेत. एक हिंदुस्तानी म्हणजे उत्तर हिंदुस्तानी शैली आणि दोन कर्नाटक शैली. संगीत, नृत्य व नाट्य या तिन्ही कला प्रयोगानेच सिद्ध होतात आणि ते या कलांचे व्यवच्छेदक लक्षण आहे. याशिवाय आणखी एक महत्त्वाचा विशेष या कलांमध्येच दडला आहे. या कलांची उत्पत्ती, स्थिती आणि लय एकाच ठिकाणी आहे. एकोणिसाव्या शतकात ध्वनिमुद्रण आणि ध्वनिचित्रमुद्रण या तंत्राचा शोध लागल्यामुळे या तीन कलांचे ध्वनिफिती वा चित्रफिती (सी.डी. वा व्ही.सी.डी.) यांच्या रूपात जतनीकरण शक्य झाले आहे. मात्र तो कलेचा साक्षात (लाइव्ह) आविष्कार नव्हे. आणखी एक मुद्दा इथे ध्यानात घ्यावयास हवा. तो म्हणजे संगीत, नाट्य आणि नृत्य या तिन्ही कलांचे वहन मानवी देहातूनच होते. तेच त्याचे साधन आहे. या प्रत्येक कलेचे मूलद्रव्य, साधन आणि माध्यम भिन्न आहे. शिवाय नृत्य व नाट्य या दृश्य व श्राव्य कला आहेत तर संगीत ही केवळ श्राव्य कला आहे. रंगमंचावर आविष्कृत होणाऱ्या नाट्याविष्काराची आणि नृत्याविष्काराची उत्पत्ती, स्थिती व लय एकाच जागी असली तरी दोन्ही कला दृश्य, मूर्त आहेत. संगीत मात्र अमूर्त, अदृश्य कला आहे. संगीताचा सारा प्रयत्न हा 'अरूपाचे रूप' दाखविण्याचा प्रकार आहे. याचाच अर्थ या कलेचे मूलद्रव्य, साधन आणि माध्यम भिन्न आहेत. संगीत ही मानवनिर्मित कला असली तरी त्या कलेचे नाते निसर्गाशी अधिक जवळचे आहे. ध्वनी हे या कलेचे मूलद्रव्य आहे. ध्वनी जसा निसर्गात आहे तसाच मानवी देहातही त्याचा वास आहे. गद्य भाषा जशी ध्वनी आणि ध्वनिसंकेतातून निर्माण झाली तसेच संगीत हेही ध्वनीतून म्हणजेच नादातून निर्माण झाले. ध्वनीला नादाचे आणि नादाला स्वराचे रूप देण्याची प्रक्रिया म्हणजेच संगीत होय.

ध्वनी म्हणजे काय? नाद म्हणजे काय? कोणताही ध्वनी नादाचे रूप धारण करू शकतो का? कोणताही नाद स्वराचे रूप घेऊ शकतो का? या प्रश्नांचा शोध घेऊनच संगीताच्या कलास्वरूपाकडे आणि पर्यायाने आस्वाद-आकलनाच्या किंवा आकलन--आस्वादाच्या प्रक्रियेकडे जाता येईल. आस्वाद-आकलनापूर्वी एक अवस्था असते ती म्हणजे श्रवण प्रक्रियेची होय. 'श्रवण' हा मोठा आणि महत्त्वाचा घटक आहे. म्हणूनच संगीतापासून होणाऱ्या आनंदाचे वर्णन करताना श्रवणसुख, श्रवणानंद, श्रवणभक्ती, श्रवणरममाणता अशा तऱ्हेचे शब्दप्रयोग केले जातात. संगीतापासून होणाऱ्या आनंदाचे म्हणजेच श्रवणानंदाचे स्वरूप आणि त्यामुळे ऐकणाऱ्याच्या मनाची होणारी

अवस्था याबद्दल या किंवा पुढील लेखांतून आपण चर्चा करणार आहोतच; इथे या आनंदाचे स्वरूप निर्भेळ, निर्विकल्प असते असे म्हटले जाते ते का याचा ओझरता उल्लेख करीत आहे.

'संगीत ही विशुद्ध कला आहे आणि साहित्य ही भ्रष्ट (अनेक संस्कार संदर्भांनी युक्त म्हणून) कला आहे.' असे सौंदर्यशास्त्राचे अभ्यासक बा. सी. मर्ढेकर यांनी म्हणून ठेवले आहे. संगीत हे वैश्विक आहे किंवा असते असे म्हटले जाते. ते 'स्थलकालातीत' असते असाही दावा केला जातो. प्रत्यक्ष कलाविष्कार आणि त्यापासून होणारा आनंद हा संदर्भयुक्त म्हणूनच विशुद्ध असतो असे म्हणता येईल. साहित्याप्रमाणे संगीत समाजसापेक्ष असते का? साहित्य हे अनेक संवेदना आणि संदर्भ घेऊन आकाराला येते. मानवी मनाचे, स्वभावाचे कंगोरे, त्याची सुखदुःखे, त्याच्या जाणिवा-नेणिवा घेऊन ते येते. साहित्य ही भ्रष्ट कला आहे असे मर्ढेकर म्हणतात ते याच अर्थाने बहुधा असावे; कारण रस, रंग, गंध, स्पर्श या संवेदना वाङ्मयाच्या कोणत्याही प्रकारात आढळतात. साहित्यातील 'रस' कल्पना आणि संगीतातील रसकल्पना या मात्र भिन्न आहेत आणि असणारच! साहित्यातील रससिद्धांताच्या आधारे संगीतातील रसाची चर्चा करण्यात हशील नाही. 'अमुक एका रागामुळे वा बंदिशीमुळे अमुक एक रस निर्माण होतो' असे विधान केले जाते. वास्तविक या विधानाला काही अर्थ नाही. अमुक राग बरोबर अमुक रस असे समीकरण अस्तित्वात नाही. उदाहरणार्थ 'अडाणा', 'शंकरा' या रागांतून रौद्र रस निर्माण होतो असे पूर्वापार संकेतांमुळे म्हटले जाते. ते सिद्ध झालेले नाही. रस हा रागाचा कारक घटक नाही. तो त्याचा परिणाम आहे. त्यामुळे वेगवेगळ्या कलांमधून निर्माण होणाऱ्या रसनिष्पत्तीचे स्वरूपही भिन्न असू शकते आणि तसे ते असतेच. प्रणयकाव्यातून शृंगाररसाचा परिपोष होतो आणि पोवाड्यातून वीररसाचा असे आपण सहजपणे म्हणतो. मात्र हिंदुस्तानी संगीतात एखाद्या रागातील ख्यालात बंदिश शृंगाररसाचे व विरह व्याकुळतेचे वर्णन करणारी असताना प्रत्यक्ष गायनातून श्रोत्याच्या मनावर उमटणारी प्रतिक्रिया या रसाशी निगडित असेलच असे नाही. स्थूलमानाने इथे एक मुद्दा नोंदविता येईल तो असा : संगीतापासून होणाऱ्या आनंदाचे स्वरूप हे केवलानंदाचे असते. चित्तवृत्ती उल्हसित करणारे हिंदुस्तानी शास्त्रीय संगीत श्रोत्याच्या अंतर्यामी शांत किंवा कारूण्य रसाचा आविष्कारच प्राधान्याने करताना दिसते. संगीताचीच नव्हे, तर कोणत्याही प्रयोगशरण वा ललित कलेची अनुभूती ही व्यक्तिसापेक्ष असते. ख्याल, ठुंबरी, भावगीत अशा कोणत्याही गायन प्रकाराच्या श्रवणातून निर्माण होणारे तरंग शेवटी श्रोत्याच्या चित्तवृत्ती एकवटण्याकडे प्रवास करतात. अमूर्त, अदृश्य कलेचे संस्करण म्हणूनच गुंतागुंतीचे बनते. संगीत कलेचे स्वरूप आणि त्याच्या आस्वाद-आकलन प्रक्रियेतील काही स्थूल मुद्यांचा येथपर्यंत निर्देश केला आहे. संगीताच्या मूलस्वरूपाचा विचार तेवढाच महत्त्वाचा आहे.

(२)

संगीताचे मूलद्रव्य, साधन आणि माध्यम या तिन्ही बाबी भिन्न भिन्न आहेत. आपण बऱ्याच वेळा त्यात गल्लत करतो. साधन हे माध्यम नव्हे. साधनातून काहीतरी आविष्कृत करावे लागते. त्यासाठी माध्यमाची गरज ही असतेच. 'ध्वनी' हे संगीताचे मूलद्रव्य आहे. आवाज म्हणजे मानवी देहातून निर्माण होणारा-हा साधनरूप असतो आणि त्यातून निर्माण होतो तो स्वर! कोणताही नाद हा कलारूप धारण करू शकत नाही. ध्वनीतून नाद निर्माण होतो. ध्वनी आणि नाद या दोन्ही अमूर्त, अदृश्य गोष्टी आहेत. त्या श्राव्य आहेत. त्या श्रवणानेच जाणवतात. त्याची प्रचीती येते. त्यामुळे संगीत ही खऱ्या अर्थाने श्राव्य-कला आहे. (चित्रपट या कलेच्या उदयानंतर म्हणजे चित्रपट बोलू लागल्यावर चित्रपटसंगीत या उपयोजित संगीताचाही उदय झाला. तेव्हा संगीत हे पडद्यावरील दृश्याच्या अनुषंगाने येऊ लागले. तिथेही ते पार्श्वसंगीत आणि प्रत्यक्ष पडद्यावरील पात्रांच्या मुखातून येणारे संगीत या दोन रूपांतून

प्रकटले.) जिथे नृत्यासारख्या कलाप्रकाराला संगीताची जोड मिळते, तिथेही ते 'दृश्य' रूप घेते. संगीत ही दृक्-श्राव्य कला नाही; परंतु चित्रपट नृत्य आणि नाटक या तीन कलांमधून येणारे संगीत हे केवळ श्राव्य राहत नाही; तर ते दृक्-श्राव्य बनते.

ध्वनी म्हणजे काय? साऊंड म्हणजे ध्वनी आणि 'व्हॉइस' म्हणजे 'आवाज' असे स्थूलमानाने म्हटले जाते. अर्थात हा शब्दकोशातील अर्थ झाला. ध्वनी म्हणजे नादाचे, संगीताचे मूलद्रव्य होय. 'ध्वनी ऐकू आला' असे आपण म्हणतो तेव्हा तो कोणताही 'आवाज' असू शकतो. त्यात नादमयता नसेल, तर तो 'गोंगाट' असू शकेल. ध्वनी निर्माण होण्याची प्रक्रिया निसर्गात सतत चालू असते. ध्वनी श्रवणप्रक्रियेतून ओळखता येतो. घोंगावणारा वारा, वादळी वारे, विजांचा कडकडाट, ढगांचा गडगडाट, समुद्राच्या लाटांची गाज, नदीच्या प्रवाहाचा खळाळणारा आवाज़, नदीच्या पात्रात प्रवाहात येणारे बुडबुडे, झाडाच्या पानांची सळसळ पावसाची रिपरिप असे मानवाला ज्ञात व अज्ञात असणारे कितीतरी ध्वनी आसमंतात ऐकू येत असतात. निसर्गातील या ध्वनीला काहींनी 'नाद' म्हटले आहे. नाद म्हणजे 'नोट' (NOTE) होय. ध्वनी हे मूलद्रव्य असल्यामुळे ध्वनिसंबद्ध घटना हा संगीताचा कच्चा माल होय, असे डॉ. अशोक दा. रानडे यांनी नमूद केले आहे. केवळ ध्वनी वा ध्वनिसंबद्ध कच्चा माल हा संगीत या व्याख्येत बसू शकत नाही. निसर्गतः निर्माण होणारा ध्वनी, वस्तू, यंत्र या द्वारे निर्माण होणारा ध्वनी आणि मानवनिर्मित ध्वनी (हाक, आरोळी, शीळ, रुदन, हास्य इत्यादी) असे स्थूलमानाने वर्गीकरण करता येते. या ध्वनीचेच पुढे नादात व नादातून संगीतात रूपांतरण होते. यात एक टप्पा मानवी भाषेचा आहे. अर्थात ही सशब्द भाषा होय. मुखावाटे नाना तऱ्हेचे ध्वनी बाहेर पडतात. प्रत्येक ध्वनीला व ध्वनिसंबद्ध उच्चारणाला अर्थ असेलच असे नाही. 'मुखावाटे उच्चारले जाणारे अर्थयुक्त ध्वनी म्हणजे भाषा होय' असे साधारणतः मानले जाते. मानवी देह आणि त्याचा गळा, मुख या अवयवातूनही ध्वनीची निर्मिती होते. हे ध्वनी असंख्य प्रकारचे असू शकतात. या ध्वनीतून नादाची कंपने तयार होतात. त्याच नादातून संगीत जन्माला येते.

ध्वनी संस्कारित होतो. त्यातूनच संगीत निर्माण होते. हा प्रवास कसा असतो याचे वर्णन संगीताच्या अनेक अभ्यासकांनी वेळोवेळी केले आहे. संगीताच्या उत्पत्तीसंबंधी काही अनुमाने केली जातात. सामवेदातून किंवा सामाच्या/गायनातून संगीताची निर्मिती झाली असे मानणारा अभ्यासकांचा एक वर्ग आहे. अर्थात आपण हे भारतीय संगीताच्या परंपरेच्या संबंधातच बोलतो आहोत. 'ध्वनी' किंवा 'निखळ ध्वनी' म्हणजे काय? त्याला नादमयता कशामुळे प्राप्त होते? नादमय ध्वनी. कला-संगीताचे, स्वराचे रूप कसे धारण करतो? कला संगीत आणि अ-कला संगीत असा भेद कशाच्या आधारे सिद्ध करता येतो, या आणि यासारख्या अनेकानेक प्रश्नांची उत्तरे शोधणे अतिशय रंजक आहे; कारण 'ध्वनी' ही श्राव्य घटना, वस्तू असली तरी ती अदृश्य आहे, तेव्हा अमूक एक ध्वनी हा संगीताचे कलारूप धारण करू शकतो हे ठरविण्याचे निकष कोणते? हिंदुस्थानी संगीतातील सप्तक कसे निर्माण झाले? 'राग' संकल्पना कशी अस्तित्वात आली? निबद्ध आणि अ-निबद्ध गायन म्हणजे काय? या साऱ्या प्रश्नांचा वेध भाष्यकाराने वाट पुसतच करावयाचा आहे.

'नाद' संकल्पनेकडे वळण्यापूर्वी ध्वनी निश्चित कसा करावयाचा याचे विश्लेषण डॉ. रानडे यांनी उत्तमरीत्या केले आहे. नैसर्गिक ध्वनींचा वर निर्देश केला आहे. मात्र हे ध्वनी पुनरुत्पादित करता येत नाहीत. त्याची पुनर्स्थापनाही होत नाही याचे सरळ साधे कारण निसर्ग हेच आहे. ध्वनीतून निर्माण झालेल्या नादाची पुनर्स्थापना व पुनर्निर्मिती करता आली व त्या ध्वनीत पुन्हा ओळखले जाण्याची क्षमता असली पाहिजे. अन्यथा तो ध्वनी हा गोंगाट ठरतो. डॉ. रानडे यांनी हा प्रवास गोंगाट – ध्वनी – नाद – स्वर असा वर्णिला आहे.

आपण गोंगाटापासून ध्वनी वेगळा काढला तरी त्यातून नाद निर्माण होईलच, असे नाही. प्रत्येक 'नाद' हा 'स्वर' होईलच असेही नाही. नादाचे वर्णन

संस्कृत ग्रंथात (संगीत रत्नाकर) तसेच 'ज्ञानेश्वरी' मध्येही आले आहे. 'नादयोगा'ची संकल्पनाही अध्यात्मवादी मांडतात. नादाचे वर्णन 'आहत' आणि 'अनाहत' असे साधारणतः केले जाते. ख्यालाच्या बंदिशींमधून अनाहत नादाचे उल्लेख ठिकठिकाणी येतात. 'अनाहत नाद अपरंपार', 'अनाहत नाद हा बरवा' 'नच पार नाद निधीला', 'नाद सो जानू' अशा आशयाच्या बंदिशी किंवा पदे आढळतात. 'आहत' म्हणजे आघाताने व्यक्त होणारा नाद होय. सर्वसामान्य माणसास किंवा श्रोत्यास त्याची प्रतीती येऊ शकते. मात्र 'अनाहत नाद' हा त्याहून वेगळा आहे. त्याचे वर्णन किंवा विश्लेषण 'आघातहीन नाद' असे केले जाते. अभ्यासकांच्या मते स्वरयोगी, साधक, तपस्वी या पदाला पोहोचलेल्या व्यक्तींनाच अनाहत नाद ऐकू येतो असे मानले जाते. हा झाला आध्यात्मिक विचार ! 'संगीत रत्नाकर' या ग्रंथात मात्र ध्वनी आणि नाद यात भेद केला आहे. संगीत आणि भाषा या दोन्हीचे मूलद्रव्य वा मूलघटक 'ध्वनी' हेच आहे. मात्र शारंगदेवाने भाषेचे मूलद्रव्य ध्वनी मानले आहे तर नाद हे संगीताचे मूलद्रव्य आहे असे म्हटले आहे.

इथे जाता जाता, मूलद्रव्य, मूल घटक, माध्यम आणि साधन यातील मतभिन्नतेचा निर्देश केला पाहिजे. काहींनी आवाज हे 'साधन' असूनही त्याचा 'माध्यम' म्हणून उल्लेख केला आहे. त्यात पु. शि. रेगे यांच्यासारखे कवी वेगळीच परिभाषा वापरतात. त्यांच्या मते 'श्रवणसंवेदना' हे माध्यम व 'स्वर' हे द्रव्य होय. एवढेच नव्हे, तर सुझन लँगर यांच्यासारख्या कला-साहित्यसमीक्षिकेने देखील स्वर वा स्वराकृती या द्रव्य घटक मानल्या आहेत. संगीत ही कला अंतिम आविष्करण असेल तर द्रव्य, साधन आणि माध्यम, यांमधील गोंधळ कमी केला पाहिजे. डॉ. रा. भा. पाटणकर यांच्यासारख्या सौंदर्यशास्त्राच्या अभ्यासकानेही 'स्वर' हेच माध्यम मानले आहे. वास्तविक मानवी गळा वा वाद्य हे साधन आहे. त्यातून प्रकट होणाऱ्या स्वराला कलारूप प्राप्त व्हावे लागते. गायक वा वादकाला नुसत्या साधनाने संगीताची निर्मिती करता येत नाही. ध्वनी किंवा नाद म्हणजे जसे संगीत नव्हे; तसेच केवळ स्वरनिर्मिती म्हणजेही संगीत नव्हे हे लक्षात घेतले पाहिजे. हा स्वर जर सुटा असेल, स्वतंत्र असेल तर तो कलानिर्मिती करू शकतो का? गायन-वादन ही या कलेची प्रत्यक्ष आविष्काराची रूपे आहेत.

येथवर ध्वनी, नाद, स्वर यांची पुरेशी चर्चा केली आहे, आणखी एका इंग्रजी शब्दाचा येथे निर्देश करावयास हवा. 'नोट' शब्दाचा वर उल्लेख केला आहेच. मग 'टोन' (TONE) म्हणजे काय? 'नोट' व 'टोन' यात काही तांत्रिक भेद आहे का? शब्दकोशात दोन्ही शब्दांच्या संदर्भातील अर्थ असे : १) नोट : सूर, स्वर, स्वरपट्टी. २) टोन : स्वर, ध्वनी, आवाज.

'नाद' शब्दाकडे अधिक लक्ष देऊया. 'नाद' वा 'नादाकृती' म्हणजे काय? नाद मोहवतो म्हणजे काय? 'बासरीचा नाद', 'सनईचा नाद' असे आपण नेहमी म्हणतो. हा नाद सांगीतिक (म्युझिकल) असतो. 'ध्वनीचे रंजक रूप म्हणजे नाद होय' अशी स्वराची व्याख्या सरसकट आढळते. मग तो नाद मानवी गळ्यातून प्रकटणारा असो, किंवा वाद्यवादनातून व्यक्त होणारा! 'नादाची रूपडी' असा शब्दप्रयोग ज्ञानेश्वरीमध्ये आहे.

नाद म्हणजे मधुर ध्वनी होय. ध्वनी वा ध्वनीच्या तरंगातून नाद निर्माण होतो. नादाची कंपने जाणवतात. नादाची तीव्रता मोजता येते. नादाचा उंचनीचपणा ओळखता येतो. यासंदर्भात ज्येष्ठ गायक आणि संगीतशास्त्रकार डॉ. श्री. ना. रातंजनकर यांनी 'संगीत परिभाषा' या ग्रंथात अतिशय सुरेख विवेचन केले आहे. ते म्हणतात, 'नाद एक मधुर ध्वनी आहे. तो संगीताचा आधार आहे.' हवेच्या प्रवाहात कोणताही आघात झाला की हवेचा प्रवाह विस्कळित होतो. हवेचे कण आघातामुळे दूर फेकले जातात व त्याच्या दूर निसटण्यामुळे आवाज निर्माण होतो. ते कण आपल्या कानापर्यंत पोहोचून कानातील श्रवणक्षम म्हणजे ऐकू येण्याची शक्ती असणाऱ्या इंद्रियांवर हवेत झालेल्या आघातांप्रमाणे आघात करतात व त्याप्रमाणे आपल्याला त्या आवाजाची जाणीव होते.

आवाज कर्णकटू, कर्कश, गोंगाट निर्माण

करणारा असू शकतो. ज्या आवाजात श्रवणयोग्य माधुर्य असते तोच नाद होतो. नादातून संगीताची उत्पत्ती होते.

नादाचे प्रकार, जात, उंचनीचपणा तपासण्यापूर्वी आणखी एक व्याख्या पाहू. ही हरी विनायक दात्ये यांनी 'गायनीकला' पुस्तकात केली आहे. रंजनक्षम ध्वनी म्हणजे नाद असे नमूद करून दात्ये नादाचे स्पष्टीकरण करतात. ते म्हणतात, "एखाद्या कंपनक्षम म्हणजे कंप पावू शकणाऱ्या पदार्थाच्या कंप पावण्यामुळे त्याच्या अवतीभोवती असणारे वातावरण दोलायमान होते व त्या लहरी सर्वदूर पसरत जातात. त्या पुरेशा जलद असल्या व आपल्या कानांपर्यंत पोहोचल्या, तर आपणास ध्वनीचा बोध होतो. यात वायू हा ध्वनिवाहकाचे कार्य करीत असतो. त्यामुळे त्याच्या या लहरींना ध्वनिलहरी असे म्हणतात. त्या नियमित व समांतर असल्या म्हणजे श्रोत्यास मधुर ध्वनीचा म्हणजे नादाचा अनुभव येतो. मग त्याला 'नादलहरी' अशी विशेष संज्ञा प्राप्त होते. नियमित व समांतर वायुलहरी आणि नाद यांचा संबंध अतूट असतो."

ध्वनी, रंजनक्षम ध्वनी आणि गोंगाट यातील भेद सामान्य श्रोत्यालाही कळू शकतात. डॉ. रानडे यांनी गोंगाट-ध्वनी-नाद आणि स्वर अशा चार पायऱ्या कल्पिल्या आहेत. आवाजाच्या समूहाला ते 'गोंगाट' ही संज्ञा देतात. ध्वनी हा ओळखू येणारा व पुन्हा उत्पादित होऊ शकणारा आवाज व नाद म्हणजे सांगितिक शक्यता (म्युझिकॅलिटी) असणारा ध्वनी होय असे ते म्हणतात. नादातून 'स्वर' निर्माण होतो. त्यासाठी त्यांच्या म्हणण्यानुसार स्वरसंहतीस अवयवभूत घटक असणारा नाद असावयास हवा.

स्थूलमानाने ध्वनीलहरींचा हा प्रवास आपण पाहिला. डॉ. रातंजनकर व ह. वि. दात्ये यांनी नादाची आणखी काही वैशिष्ट्ये वर्णिली आहेत. आवाजाची फ्रिक्वेन्सी (वारंवारिता) डयुरेशन (काल), विस्तार व गुणधर्म (क्वालिटी) अशीही अंगे त्यात येतात. डॉ. रातंजनकर यांनी कंपनाचा वेग, कंपनाची उच्चनीचता, लहानमोठेपणा याचे विश्लेषण केले आहे. नादाची तीव्रता, उंचनीचपणा नादोत्पादक कंपनावर अवलंबून आहे. नादातूनच श्रुती व स्वर निर्माण होतो. स्वरातूनच संगीत निर्माण होते. संगीत कोठे, कधी, कसे निर्माण झाले याबद्दल पुढील लेखात चर्चा केली आहे. 'स्वरा'च्याही विविध व्याख्या आहेत. संगीत म्हणजे, गीत, वाद्य, नृत्य यातून जन्माला येणारा आविष्कार होय. 'स्वरंजयति इति स्वरः' अशी व्याख्या स्वराबद्दल आढळते. 'हिंदुस्थानी संगीत' या ढोबळ संज्ञेखाली येणाऱ्या संगीताचा म्हणजे ख्यालाचा विकास फारसा जुना नाही. शेदोनशे वर्षांचा असेल. त्यापूर्वी धृपद होते म्हणजे नेमका कोणता गानप्रकार होता? त्याहीपूर्वी 'प्रबंधगायन' होते ते कसे? संगीताची उत्पत्ती सामवेदातून झाली याला आधार कोणता? अमीर खुस्री यांनी ख्यालगायकी आणली ती कशी?

हे आणि असे बरेच प्रश्न या लेखमालेच्या चर्चेत येणार आहेत. राग संकल्पना राग-रस, राग-समय यांचा संबंध व संकेत, संगीताच्या आकलन-आस्वादाच्या विविध पायऱ्या व प्रत्यक्षातील समीक्षा हेही विषय घ्यावयाचे ठरविले आहे.





अनुक्रमणिका

## काल, आज आणि उद्या

# छपरात दरवाजा ठेवणारी विचित्र संस्कृती

**साक्षी**

हल्ली 'वास्तुशास्त्र' नावाची विद्या बरीच लोकप्रिय झाली आहे. निसर्गातील ऊर्जा घरात मुबलकपणे यावी या दृष्टीने घराची रचना कशी असावी, हे ती विद्या सांगते. घराचा दरवाजा कोणत्या दिशेला हवा; स्वयंपाकघर कोठे करावे; दिवाणखान्याला खिडक्या कोणत्या भिंतीत व केवढ्या आकाराच्या ठेवाव्यात इत्यादी गोष्टींविषयी तपशिलवार सूचना वास्तुशास्त्रज्ञ देतात व घरमालक त्या सूचनांप्रमाणे घरे बांधतात, असे कळते. काही कुटुंबे तर आपल्या वडिलोपार्जित घरात मोठ्या प्रमाणावर पाडापाड करून घरे पाहिजेत तशी करून घेतात, असाही अनुभव आहे.

'घराचा दरवाजा' ही वास्तुशास्त्राच्या दृष्टीने महत्त्वाची बाब आहे. दरवाजा पूर्वेला असावा, दक्षिणेला नक्कीच नको, दरवाज्यापाशी कोणती झाडे लावावीत याबद्दल पुष्कळ आग्रह धरला जातो. कसेही असले, तरी दरवाजा रस्त्यावर उघडणारा असला पाहिजे, हे बंधन तर राहातेच. पूर्वीच्याकाळी लोक भुयारे खणून अडचणीच्या प्रसंगी आपल्या गढीवजा घरातून, वेढा घालणाऱ्याला चुकवून बाहेर पडण्याची वाट तयार करून ठेवीत, असे म्हणतात. त्याला जमिनीत किंवा तळात उघडणारा दरवाजा असे म्हणता येईल. शनिवार वाड्यापासून पर्वतीपर्यंत भुयार आहे किंवा होते अशी काही भाबड्या लोकांची आजही समजूत आहे. छत्रपतींच्या काळावर लिहिलेल्या कादंबऱ्यातून भुयारे, बळदे, चोरवाटा यांचा इतका बुजबुजाट आढळतो की, लोक जमिनीवर न वावरता खरोखरच कायमचे भूमिगत असत असे वाटू लागते.

तथापि घराच्या छपरात दरवाजा करावा, ही अद्भुत कल्पना अजून कोणी प्रत्यक्षात आणली असेल असे वाटत नाही. याचे सहज पटणारे कारण असे की, दरवाज्यातून बाहेर पडल्यावर माणसाला रस्त्याला लागायचे असते. त्यासाठी आधी छपरातून बाहेर पडा मग जिना उतरून खाली या, ही आडनिडी व्यवस्था कोण करील? बरे, कोणा अडाण्याने घराची तशी रचना केलीच, तरी घरातून बाहेर पडण्याचा, म्हणजे जिन्याने उतरून आल्यावर लागणारा, दरवाजा जमिनीवरच असणार. त्याला काही छपरातला दरवाजा म्हणता येणार नाही.

पण आता आम्ही अशा समाजाची हकीकत सांगणार आहोत की, त्यातील लोक घरांना फक्त छपरातच दरवाजा ठेवीत व आपल्या छपरावरून शेजारच्या घराच्या छपरावर असे उड्या मारीत किंवा बांबूच्या शिड्या आडव्या टाकून जात. गावात मुळी रस्तेच नसत; घरांच्या माथ्यांवरूनच रहदारी चाले! हे कसे होत असेल याचे काल्पनिक चित्र मुखपृष्ठावर दिलेले आहे.

(१)

तुर्कस्थानची राजधानी अंकारा हिच्यापासून दक्षिणेला २०० मैलांवर कोन्या नावाचे मैदान आहे. त्या मैदानातून 'सरसांबा' नावाची लहानशी नदी वाहते. एके ठिकाणी, या नदीच्या दोन्ही काठांवर दोन उंच टेकाडे आहेत. स्थानिक लोकात प्रवाद होता की, ही टेकाडे नैसर्गिक नसून माणसांनी तयार केलेली आहेत. १९६१ साली नदीच्या पूर्व काठाला असणाऱ्या टेकाडावर एका ब्रिटिश पुरातत्त्व-अभ्यासू संघाने उत्खननाला सुरुवात केली आणि थोड्याच अवधीत अभ्यासकांच्या लक्षात आले की, एके काळी इथे मध्यपूर्वेतील सर्वात मोठी, सर्वात महत्त्वाची व मती गुंग करून टाकणारी मनुष्यवस्ती नांदत होती. हे लोक विशाल घरातून राहात; त्यांची मोठाली देवळे असत, तऱ्हेतऱ्हेच्या कलापूर्ण

अनुक्रमणिका

वस्तू ते तयार करीत, दूर दूरच्या ठिकाणांशी त्यांचा व्यापार चाले. तेथे सापडलेल्या अवशेषांची रेडिओ-कार्बन चाचणी केली तेव्हा असे आढळले की, ही वस्ती इ.स.पू. ६२५० ते ५४०० या काळात होऊन गेली असावी. पण आता अधिक चाचण्या झाल्यावर हा काळ आणखी पूर्वीचा, म्हणजे इ.स.पू. ७२०० ते ७१००, असावा असे ठरले आहे.

वर आम्ही म्हटलेच आहे की, १९६१ साली या वस्तीचा शोध लागला. त्यानंतर पुरातत्त्व अभ्यासकांनी अशा आणखी वस्त्या तुर्कस्थानात इतरत्र तसेच इराण, इराक, सीरिया या देशात शोधून काढल्या आहेत. १९९३ पासून या उत्तर-अश्म-युगीन संस्कृतीच्या शोधाच्या मोहिमेला आणखी गती मिळाली असून फार चित्ताकर्षक बाबी कळून येत आहेत. मनुष्य एका जागी वस्ती करून राहायला लागला व शेतीवर उपजीविका सुरू झाली त्या काळातील ही तुर्कस्थानातील वसाहत आहे. ही माणसे धान्य पिकवून खात होती, देवदेवतांच्या मूर्ती लाकडे व दगड कोरून तयार करीत होती आणि दूरवरच्या लोकांशी व्यापार देखील करीत होती.

आम्ही सुरुवातीलाच म्हटल्याप्रमाणे या गावाची रचना मोठी विलक्षण आहे. इथली घरे मातीच्या विटांची बांधली आहेत. दोन घरे परस्परांना चिकटून असत; पण त्यांच्या भिंती स्वतंत्र असत. त्यामुळे एक घर पाडून पुन: बांधले तरी शेजारच्या घराला इजा पोचत नसे. परिणामी संपूर्ण पेठ, किंवा गावाचा भाग म्हणा, मधमाश्यांच्या पोवळ्यासारखा दिसे. प्रत्येक घर म्हणजे पोवळ्याचे एक छिद्र. घरे चौकोनी पेट्यांसारखी. घराला गच्ची असे आणि गच्चीतले पाणी वाहून नेण्यासाठी मातीच्या बंद नळ्या गच्चीतून काढून अंगणात सोडत. गावात रस्ताच नसल्यामुळे आपल्या घराला जसे मुख्य दार असते तसे दार या घरांना नसे. घरात जायचे म्हणजे छपरातून खाली उतरायचे! ही अशी विचित्र पद्धत का होती, ते काही कळत नाही. इराण, इराक, सीरीया इत्यादी भागात याच संस्कृतीच्या इतर वस्त्या सापडल्या आहेत. तिथेही छपरातून घरात प्रवेश करण्याचीच सोय होती! यावरून असे दिसते की, मध्यपूर्वेत इ.स.पू. ७-८ हजार वर्षापूर्वीच्या कालखंडात छपरात प्रवेशद्वार बसविण्याचीच प्रथा होती. ही अगदी सुरुवातीचीच शेतकरी वस्ती होती. वस्तीला रानटी जनावरांचा उपद्रव होतच असणार. छपरात दार केल्यावर ही जनावरे घरात घुसण्याची भीती कमी, हाही यामागे विचार असेल.

आतापर्यंतच्या उत्खननात वस्त्यांचे एका-खाली-एक असे चौदा थर सापडले आहेत. जाणकारांचा असा अंदाज आहे की, पहिल्या वस्तीच्या सुरुवातीपासून तो अखेरच्या वस्तीच्या शेवटापर्यंत आठशे वर्षे लोटली असावीत. पण प्रत्येक थरावरील घराची रचना अशीच, छपरातील प्रवेशद्वार असणारी, आहे. घरांची इतर रचनाही फारशी बदलली नाही. घरात एक वीस फूट लांब व तेरा फूट रुंदीचा दिवाणखाना असे. या दिवाखान्याला लागून कोठीची खोली. दिवाणखान्याच्या दक्षिणेला स्वयंपाकघर असे. पण दिवाणखान्यातून स्वयंपाक घरात जायचे तर गच्चीत जाऊन व शिडीवरून उतरून जावे लागे. या स्वयंपाकघरात चूल, जळण, जमिनीत खणलेल्या खड्ड्यात स्वयंपाकाची भांडी ठेवलेली असत. धूर जाण्यासाठी छपराला भोक पाडलेले असे. भांड्यातील पदार्थ शिजण्यासाठी कधी कधी अशी युक्ती वापरीत. एक दगड जाळावर खूप तापवायचा व ज्यात शिजायला धान्य घातले आहे त्या भांड्यात तो टाकायचा.

दिवाणखान्याच्या उत्तरेकडील भागात, भिंतींना लागून ओटे तयार केलेले असत. या ओट्यांचा उपयोग बसायला, कामे करायला व रात्री झोपायला होई. मधल्या भागात व ओट्यांवरही बांबूंच्या चोयींच्या चध्या टाकलेल्या असत. पण या ओट्यांचा मुख्य उपयोग असे, तो प्रेते पुरण्यासाठी. घरातील कुणी माणूस मेले, तर ओट्यामध्ये ५-६ फूट खोल खड्डा करीत व त्यात, हात-पाय दुमडून प्रेत पुरून टाकीत. प्रेताबरोबर काही दागिने, आरसे, हत्यारे, टोपल्या, भांडी अशा वस्तूही पुरत. यावरून असे लक्षात येते की, या लोकांचा पुनर्जन्मावर विश्वास होता. ओट्यांखाली पुरलेली प्रेते लहान मुलांचीच आहेत. असे वाटते की, घरात नवरा-बायको व त्यांची मुले अशी सडी कुटुंबेच राहात असत. बऱ्याच

घरांविषयी असेही आढळले की, प्रौढ माणसाचा मृत्यू झाल्यानंतर त्याचे प्रेत ओट्याखाली पुरून कुटुंबाने ते घर सोडून दिले. मग त्या घराचे पूजास्थानात रूपांतर करण्यात आले.

(२)

या वस्तीला संशोधकांनी 'साटाल ह्युयुक' असे नाव दिले आहे; कारण, सध्या त्या गावाचे नाव 'साटाल' असे आहे. 'ह्युयुक' याचा अर्थ कृत्रिम टेकडी. साटाल गावालगतच्या ढिगाऱ्याखालील ही वस्ती. इथल्या घरांचे वर्णन वर दिलेच आहे. बहुतेक घरात सापडलेल्या वस्तू एकसारख्याच आहेत. त्या म्हणजे अन्न व चटया यांचे अवशेष; खापरे, लाकडे व दगडांची भांडी, मणी आणि हत्यारे व अवजारे. या भागात लाव्हाने तयार झालेला अतिशय कठीण व चकचकीत दगड सापडतो. हत्यारे व आरसे अशा दगडाचे केलेले असत.

ही माणसे शेती करणारी असली तरी मुख्यत: मांसाहारीच होती. तेथील सांगाड्यांच्या दातांच्या स्थितीवरून हे ध्यानात येते. घरी पाळलेल्या जनावरांचे व शिकार केलेल्या श्वापदांचे मांस यांच्या खाण्यात असे. शेळ्या, मेंढ्या, कुत्रे असे प्राणी हे लोक पाळीत असत. रानडुकरे, घोडे, हरणे, चित्ते, रानटी गाढवे, सिंह आणि रानमांजरे अशा जनावरांची ते शिकार करीत. या शिकारीचा हेतू खाण्यासाठी मांस मिळावे आणि कातडी सोलून त्यांची प्रावरणे करावीत, असा असे. हे लोक नाना प्रकारची धान्ये पिकवीत. पण धान्ये दळून त्यांच्या भाकरी करून खाण्यापेक्षा ती धान्ये भाजून किंवा त्यांची कढणे करून खाण्याकडेच त्यांचा कल असे. हे शेतकरी भाज्याही पिकवीत असत आणि गळिताचे एक मोहोरीसारखे पीक घेऊन त्याच्यापासून तेलही काढीत. घरापासच्या दलदलीच्या भागातून आणि कोन्या मैदानाच्या जवळच्या रानातून द्राक्षे, पिस्ते, अक्रोड अशी फळे गोळा करून आणून ते खात असत. अलिकडच्या उत्खननातून असेही आढळून आले आहे की, कंदमुळे हा साटाल ह्युयुकच्या लोकांच्या आहारातील मोठा घटक होता.

कोन्या या मैदानी विभागात अन्न आणि बांबू यांच्या पलीकडे काही उत्पन्न होत नसे. बाकी, मनुष्य-वस्तीला लागणारे, सारे जिन्नस आयात करावे लागत. घरे बांधायला लागणारी लाकडे पन्नास मैल दक्षिणेला जाऊन आणावी लागत. तेथे 'टॉरस' नावाचा पर्वत आहे. त्या पर्वतावर ओक, पाईन अशी दर्जेदार लाकडे देणारी झाडे आहेत. अशी झाडे तोडून त्याचे ओंडके सारसांबा नदीत ढकलून देत व साटाल इथे ते वाहात आले की, उचलून घेत. तांबे व शिसे हे धातू टॉरस पर्वतातच सापडत. ईशान्येला (आज) कॅपाडोशिया नावाचा प्रांत आहे. त्या भागातून लाव्हापासून बनलेले दगड आणवत आणि त्या कठीण दगडांपासून बाणांची धारदार टोके व सुऱ्या तयार करीत. साटाल ह्युयुक या ठिकाणी शिंपले सापडले आहेत. ते भूमध्य समुद्राच्या काठावरून गोळा करून आणत असावेत.

साटाल ह्युयुक येथील कारागीर इतर अनेक प्रकारचा कच्चा माल रंग, मणी, भांडी, हत्यारे करण्यासाठी वापरत. तांबडी व पिवळी काव, कठीण दगडाच्या शिळा, चुना अनेक प्रकारचे खनिज-पदार्थ असे जिन्नस त्यांना दूर-दूरच्या ठिकाणाहून आणावे लागत. असे दिसते की साटाल ह्युयुक येथील वस्तीचा प्रभाव आसपासच्या ११,००० चौ. मैलांच्या प्रदेशात जाणवत असला पाहिजे.

(३)

असा अंदाज करायला जागा आहे की, साटाल ह्युयुक येथील समाज व सीरिया, इराक, इराण येथील त्याच संस्कृतीच्या वस्त्या यांच्यातील एक महत्त्वाचा दुवा धर्म हा देखील होता. घरा-घरातून देवघरे होती व देवघरांची सजावट करताना भिंतींवर रंगीत चित्रे काढत, भिंतीवरील गिलाव्यात रंगवलेल्या आकृत्या तयार करीत, किंवा गिलाव्यात चौकटी तयार करून त्यात देखावे रंगवत. भित्तिचित्रांमध्ये साध्या गोल-चौकोनी आकृत्यांपासून मनुष्याच्या हातांचे रंगीत ठसे

एका–शेजारी–एक उमटवून केलेले गुंतागुंतीचे घाट बनविण्यापर्यंत नाना प्रकार दिसून येतात. काही देखाव्यात माणसाच्या प्रेताभोवती घिरट्या घालणारी गिधाडे, धुमसणारा किंवा आग ओकणारा ज्वालामुखी, हरणाची शिकार, मृगयानृत्ये अशा घटना चितारल्या आहेत.

भिंतीवरच्या गिलाव्यात कोरलेल्या देखाव्यात मात्र तेच ते प्रसंग दाखविले आहेत. वारंवार दाखवलेला प्रसंग म्हणजे प्रसूत होणारी देवता! या देवतेने हात व पाय उचलून धरले आहेत व ती एका बाळाला जन्म देते आहे. एका देखाव्यातील स्त्री बैलाच्या डोक्याला जन्म देत आहे तर दुसऱ्या एका देखाव्यात एक स्त्री बोकडाच्या डोक्याला जन्म देताना दिसते. या चित्रांचा नक्की अर्थ व संदर्भ यांचा उलगडा अजून होत नाही.

अनेक इमारतींवर बैलांची मातीची डोकी करून चिकटवलेली सापडली. कधी कधी या डोक्यांना शिंगे मात्र खऱ्या बैलाची बसवलेली आढळतात. बैल हा नर–तत्त्वाचा प्रतिनिधी समजला जात असावा. परंतु मनुष्याच्या आकृतीला बैलाचे मुंडके बसवले आहे, अशा प्रकारचा देखावा कधी दिसला नाही. स्त्री–तत्त्वाची नाना रूपे या देखाव्यातून दिसतात. 'प्रसूत होणाऱ्या देवतां'विषयी वर लिहिलेच आहे. गर्भवती स्त्रियांच्या आकृत्यांही दिसतात.

काही भिंतीवरील देखाव्यात जनावरे व माणसे कडेने जशी दिसतील (सिल्हुएत्त) तशी दाखविली आहेत. यात बैल, हरिणे, रानडुक्करे, गाई यांची चित्रे दिसतात. नाचणारी, निरनिराळ्या कामात गुंतलेली, पळणारी माणसेही या चित्रातून दाखविली आहे. बैलरुपी देवासमोर नैवेद्य म्हणून मांस ठेवले आहे, असेही चित्र आहे.

या चित्रांच्या विविधतेवरून असे दिसून येते की, साटाल ह्युयुक या संस्कृतीतील माणसांमध्ये धर्म–भावना बऱ्याच प्रमाणात विकास पावली होती. तुर्कस्थानच्या दक्षिण भागात नंतरच्या काळातील समाजाने ज्या देव–देवतांची कल्पना केली, त्या देव–देवतांची आदिम रूपे आपल्याला साटाल ह्युयुक येथील समाजाने काढलेल्या या चित्रात दिसतात.

(४)

साटाल ह्युयुक या संस्कृतीचे लोक तुर्कस्थानाच्या दक्षिणेला भूमध्य समुद्राचा जो किनारा आहे, तेथून निघून कोन्या या मैदानात शेतीसाठी आले असावेत. या किनाऱ्यावरील डोंगरात ज्या गुहा आहेत त्या गुहातील भिंतीवर काढलेली चित्रे साटाल ह्युयुक इथल्या घरातील चित्रांची उगमस्थाने असावीत, हे सहज दिसून येते.

साटाल ह्युयुक येथील संस्कृती अनेक हजार वर्षे चांगल्या भरभराटीत होती. कोन्याच्या मैदानात या संस्कृतीच्या लोकांच्या अनेक वस्त्या पसरल्या होत्या. इ.स.पू. ३००० च्या सुमाराला इथे शहरे वसवली गेली. पण त्यावेळी साटाल ह्युयुकचे लोक इथून उठून दुसरीकडे वस्तीला गेले होते. पण विशेष असे की, इ.स.पू. २००० च्या आसपास हा सर्व भाग पूर्ण ओसाड झाला. तथापि, अगदी आता सुद्धा, कोन्याच्या मैदानात नव्याने जी खेडी वसली आहेत त्यांच्या भिंतींवर साटाल ह्युयुक लोकांनी त्यांच्या घरांच्या भिंतींवर ज्या तऱ्हेची चित्रे रंगविली होती, तशीच चित्रे दिसतात. ती कलाकारी ९००० वर्षे टिकून आहे. परंतु छपरात दरवाजे करण्याची प्रथा मात्र काळाच्या ओघात लोक विसरून गेले आहेत.

(आधारित.)

# वाचकांचा पत्रव्यवहार

(१)

मा. संपादक,

'नवभारत', वाई

सप्रेम नमस्कार.

'राज्यघटनेत सुधारणा' हा डॉ. सुभाष आठले यांचा व्यासंगपूर्ण आणि स्वतंत्र दृष्टिकोण मांडणारा लेख नवभारतच्या अंकात वाचला. मी राज्यघटनेसंबंधी वेगळा दृष्टिकोण मांडीत आहे तो पुढीलप्रमाणे :

१९५० साली ज्यावेळी घटना समितीने भारताची राज्यघटना स्वीकारली त्यावेळी सर्व क्षेत्रांतील अंतिम सार्वभौम अधिकार केंद्र शासनाकडे ठेवणे आवश्यक होते. परंतु आता परिस्थिती खूप बदलली आहे. राज्यांना (स्टेट्स) कारभाराचा अनुभव आला आहे. शिवाय कृषी, ग्रामविकास आदि क्षेत्रांतील प्रत्येक राज्याच्या समस्यांचे स्वरूप वेगळे आहे. त्यामुळे आता आपण फेडरल (संघराज्य) स्वरूपांची नवी घटना तयार करून ती अंमलात आणली पाहिजे. या घटनेनुसार भारतातील सर्व जनतेचे हित लक्षात घेऊन केंद्र शासनाकडे पुढील विभागांचे सर्वाधिकार असावेत :

१) संरक्षण

२) परराष्ट्र विषयक धोरण

३) परराष्ट्रांशी अर्थसंबंध

४) सर्व दळवळणाचे मार्ग – रेल्वे आणि केन्द्रीय हवाई वाहतूक इ.

५) सर्व नैसर्गिक संपत्ती (नद्या, जंगले इ. मात्र जमीन नाही.)

६) चलन (करन्सी)

७) सर्व राष्ट्रीय प्रकल्प

या खात्यांची उद्दिष्टे स्पष्ट असून त्याच्याबाबत जवळजवळ कोणतेही मतभेद असणार नाहीत. त्यामुळे केंद्र शासन हे राष्ट्रीय सरकार किंवा राष्ट्रीय एकमत असलेले सरकार (नॅशनल कॉनसेन्सस् गव्हर्मेंट) असेल. लोकसभेची निवडणूक घेऊन त्यामधील सर्वात अधिक संख्या असलेल्या पक्षाने अन्य पक्षांशी वाटाघाटी करून वर उल्लेखिलेल्या सात खात्यांसाठी राष्ट्रीय सरकार स्थापन करावे. पक्षांच्या सभासद संख्येनुसार त्यांना मंत्रिमंडळात प्रतिनिधित्व मिळावे.

वरील सात विभाग सोडून अन्य सर्व खात्यांचे प्रत्येक राज्यापुरते सर्वाधिकार त्या राज्याच्या मंत्रिमंडळाकडेच असावे. विधानसभेच्या निवडणुकीत बहुमत मिळविलेल्या पक्षाचे किंवा पक्षांच्या आघाडीचे शासन वेगवेगळ्या राज्यांमध्ये अस्तित्वात येईल. दोन राज्यांमध्ये कोणत्याही बाबतीत संघर्ष झाल्यास त्याचा निर्णय केंद्र शासन घेईल आणि तो बंधनकारक राहील. आवश्यक असल्यास काही प्रकरणे सर्वोच्च न्यायालयाकडेही सोपवावीत. रस्ते, रेल्वे

अनुक्रमणिका






मार्ग, हवाई मार्ग याबाबतचे अंतिम सार्वभौम अधिकार केंद्र शासनाकडेच असतील. भारतासाठी एकच करन्सी (चलनपद्धती) असेल आणि तिच्यावर केंद्राचेच नियंत्रण असेल.

शिक्षण, आरोग्य, ग्रामविकास आदि खात्यांचेबाबत राज्यासाठी धोरणविषयक निर्णय घेऊन त्यांची कार्यवाही करण्याचे अधिकार राज्य शासनाच्या मंत्रिमंडळाकडेच असतील.

न्यायव्यवस्था आजच्याप्रमाणेच असेल. सुप्रीम कोर्टाकडेच अंतिम निर्णय देण्याचा अधिकार असेल. प्रत्येक राज्यामध्ये तेथील सर्वोच्च न्यायालय असेल.

लोकशाहीत राज्यकारभारात जनतेला सहभागी करून घेण्याचे उद्दिष्ट ठेवून पंचायत राज्यांना अधिकार देण्याची जी घटना दुरुस्ती राजीव गांधी पंतप्रधान असताना केली आहे, तिची कार्यवाही ही नवी घटना अंमलात आल्यानंतर एक वर्षाच्या आत सर्व राज्यशासनांना करावी लागेल.

भारत हा खंडप्राय देश असल्यामुळे येथे संघराज्य पद्धतीची (फेडरल स्वरूपाची) घटनाच असणे आवश्यक आहे. त्याचप्रमाणे लोकांनी केवळ मतदान करून प्रतिनिधींच्याकडे राज्यकारभाराचे अधिकार देण्याऐवजी लोकांचा सहभाग राज्यकारभारात आवश्यक आहे. त्यासाठीच पंचायतींना अधिकार देणे आवश्यक आहे असे झाले तरच भारतीय लोकशाही लोकांची, लोकांकरिता होईल आणि लोकांकडून चालविली जाईल.

आपला,<br>
**ग. प्र. प्रधान**<br>
द्वारा, महाराष्ट्र आरोग्य मंडळ,<br>
हडपसर, पुणे – २८.

(२)

प्रा. डॉ. श्री. मा. भावे<br>
संपादक, नवभारत मासिक, वाई

जून २००८ चा आपला अंक वाचला. त्यातील सर्वच लेख उद्बोधक वाटले. म. गांधींच्या हत्येचे श्री. भावे यांनी केलेले विश्लेषण पटण्याजोगे होते. म. गांधींच्या खुनाची जबाबदारी हिंदुत्वनिष्ठांनी गांधी व काँग्रेस यांच्याविषयी केलेल्या प्रचारावर टाकण्याचा प्रयत्न डाव्या व पुरोगामी लोकांनी गेली ५०/६० वर्षे अव्याहतपणे चालविला आहे. त्याला उत्तर देणारा संयमपूर्ण युक्तिवाद श्री. भावे यांनी केला आहे, असे दिसते. यावर विरोधी पक्षाचे काय म्हणणे आहे ते आता पाहिजे पाहिजे. एकूण अंक आवडला. मी 'नवभारत' गेली अनेक वर्षे वाचत आलो आहे.

कळावे, ही विनंती.

आपला,<br>
**मा. श्री. दीक्षित**<br>
८४७, सदाशिव पेठ,<br>
पुणे–३०.












## लेखकांचा परिचय

- **प्रा. अरविन्द पारसनीस**

  भूतपूर्व (१९६०–८९) भौतिकी प्राध्यापक, आय. आय. टी., कानपुर

  ***पत्ता :*** एफ् – १७ चैत्रवन् रेसिडेन्सी, १२७/२ औंध, पुणे (महाराष्ट्र) ४११ ००७.

- **प्रा. श्री. मा. भावे**

  माजी प्रपाठक व विभाग प्रमुख, गणित विभाग, नौरोजी वाडिया कॉलेज, पुणे; गणित व तत्त्वज्ञान या विषयांत पी.एच्.डी. व पदवीत्त्युर संशोधन; शिक्षक चळवळीत सहभाग; शिक्षण, गणित व तत्त्वज्ञान विषयावर २५ शोधनिबंध प्रसिद्ध.

  ***पत्ता :*** ३३/२०, ४ थी गल्ली, प्रभात रोड, पुणे – ४११ ००४.

- **प्रा. विठ्ठल दहिफळे**

  प्राध्यापक, राज्यशास्त्र विभाग वरिष्ठ, पीपल्स कॉलेज, नांदेड. साधना मासिक व दै. लोकमत यामध्ये लेख प्रकाशित.

  ***पत्ता :*** पीपल्स कॉलेज, नांदेड (मराठवाडा).

- **प्रा. म. अ. मेहेंदळे**

  माजी प्राध्यापक, संस्कृत विभाग व माजी सहयोगी प्रमुख संपादक, संस्कृत कोश विभाग, डेक्कन कॉलेज, पुणे; संपादक, महाभारताचा सांस्कृतिक कोश, भांडारकर प्राच्य विद्या संशोधन मंदिर, पुणे. वैदिक वाङ्मयातील प्रश्नोत्तरे (१९८०), भारतीय द्यूत (१९९०), पू. विनोबा-कृत ऋग्वेद-सारचे मराठी भाषांतर (१९८२), जरथुश्त्राच्या गाथांचे मराठी भाषांतर (१९९४), या ग्रंथांचे लेखक; नवभारतांत लेखन.

  ***पत्ता :*** बी-४, प्रबोधन हाऊसिंग सोसायटी, ६१ ए/९–१०, कर्वे रोड, एरंडवणे, पुणे ४११ ००४.

- **प्रा. प्रसन्नकुमार अकलूजकर**

  वृत्तपत्रलेखक, केसरीतील माजी संपादक आणि आता पुणे विद्यापीठाच्या वृत्तपत्रविद्या विभाग येथे प्राध्यापक.

  ***पत्ता :*** वृत्तपत्रविद्या विभाग, रानडे इन्स्टिट्यूट, फर्ग्युसन कॉलेज रस्ता, पुणे–४११ ००४.

अनुक्रमणिका